

# ३

# व्यक्ति-स्वातंत्र्याचा विकास

लेखक

श्री. मा. प. मंगुडकर



मूल्य दोन रुपये

१९५५

बहि:शाल शिक्षण ग्रंथमाला

पुणे विद्यापीठ



बहि:शाल शिक्षण मंडळ

संपादक
डॉ. अ. वि. नाईक, एम्. ए, पीएच्. डी.
सचिव, बहि:शाल शिक्षण मंडळ,
गणेशखिंड, पुणे ७.

३

# व्यक्तिस्वातंत्र्याचा विकास

लेखक

माणिक पद्मण्णा मंगुडकर, एम्. ए.



सन १९५५ ]

[ मूल्य दोन रुपये.

# प्रकाशक-निवेदन

मुंबई सरकारच्या सन १९४८ च्या पुणें विद्यापीठ कायद्यांतील २६ व्या कलमान्वयें, पुणें विद्यापीठानें १९५० सालीं **बहिःशाल शिक्षण मंडळ** स्थापन केलें. मंडळाच्या उद्देशापैकीं सामान्य जनतेला उपयुक्त असणाऱ्या व आकलन होणाऱ्या विषयावर पुस्तकें लिहून घेण्याची व प्रसिद्ध करण्याची व्यवस्था करणें हा एक आहे.

तदनुसार 'व्यक्तिस्वातंत्र्याचा विकास' हें पुस्तक श्री. मा. प. मंगुडकर, एम्. ए. याजकडून मंडळानें तयार करून घेतलें आहे व तें आतां **बहिःशाल शिक्षण** ग्रंथमालेंतील तिसरें पुष्प म्हणून प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

पुणें विद्यापीठ,
गणेशखिंड, पुणें ७.
मिति चैत्र शु. १, शके १८७७
२४।३।५५

अ. वि. नाईक
सचिव,
बहिःशाल शिक्षण मंडळ.

# निवेदन

व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न आज जितका गुंतागुंतीचा आणि निकडीचा झाला आहे तितका तो यापूर्वींच्या काळांत कधीं झाला असेल असें वाटत नाहीं. कारण यापूर्वीं कधींही झाली नव्हती इतकी आजची राज्यसत्ता बलिष्ठ होत चालली आहे. याला तंत्रविद्येंतील प्रगतीप्रमाणें वैचारिक क्षेत्रांतील नवीं आंदोलनें अंशतः जबाबदार आहेत. तंत्रविद्येतील विकासामध्ये मुख्यत: चार गोष्टींचा अंतर्भाव करतां येईल :

( १ ) अणुबाँब, हैड्रोजनबॉंब याच्यासारखीं विध्वंसक युद्धशास्त्रें

( २ ) कापड, वीज इत्यादि उत्पादनाचीं मोठीं यंत्रें

( ३ ) विमानें, आगबोटी, आगगाड्या इत्यादि दळणवळणाचीं कार्यक्षम साधनें

( ४ ) रेडिओ, वृत्तपत्रे, चित्रपट यासारखीं प्रचाराचीं साधने

तत्रविद्येंतील वरील शोधामुळें राज्यसत्ता अत्यंत सामर्थ्यशाली बनली आहे. परंतु समाजवादी अर्थव्यवस्थेच्या आणि लोककल्याणकारी राज्याच्या नव्या विचारानें तिला आणखी बळ आलेले आहे. समाजवादी अर्थव्यवस्थेप्रमाणें महायंत्रोत्पादनाच्या साधनाची मालकी राज्यसरकारकडे जात असून तेथे नियोजनाबरोबर आर्थिक सत्तेचें केंद्रीकरण होत आहे व लोककल्याणकारी राज्याच्या उदयामुळें राज्याकडे अनेक महत्त्वाचीं कामें सुपूर्त केलीं जात असून त्यामुळें तेथे राजकीय आणि सामाजिक सत्तेचे केंद्रीकरण होत चालले आहे. ही सर्व स्थित्यंतरें सर्वस्वी अनिष्ट आहेत असें मला सुचवावयाचें नाहीं. फक्त वरील तांत्रिक आणि वैचारिक प्रगतीबरोबर आजची राज्यसत्ता कशी 'कर्तुमकर्तुम्' बनत चालली आहे एवढेंच ध्वनित करावयाचें आहे. सत्तेच्या केंद्रीकरणामुळें व्यक्तिस्वातंत्र्यावर नवें संकट येण्याचा संभव आहे. म्हणूनच आजच्या काळांत व्यक्तिस्वातंत्र्यासारखा जिव्हाळ्याचा प्रश्न अत्यंत गुंतागुंतीचा व बिकट होत चालला आहे.

या प्रश्नाची ऐतिहासिक पार्श्वभूमि लक्षांत यावी म्हणून व्यक्तिस्वातंत्र्याची कल्पना गेल्या अडीच हजार वर्षांत कशी उत्क्रान्त होत आली आहे याची अत्यंत स्थूलमानानें चर्चा केली आहे. ही ऐतिहासिक समीक्षा करतांना राज्यशास्त्रांतील समूहवादी आणि व्यक्तिवादी विचारशाखाचा ढोबळ स्वरूपात परामर्ष घेतला आहे. समूहवादांतील आदर्शवादी व साम्यवादी विचारप्रणालि व व्यक्तिवादी शाखेतील आत्यंतिक व्यक्तिवादी आणि शासनयुक्त समाजव्यवस्थेचा पुरस्कार करणारी अराज्यवादी विचारप्रणालि याचा विचार करुन वरील सर्व विचारशाखा आजचे आपले गुतागुंतीचे प्रश्न सोडविण्यास अपुऱ्या आहेत हे सांगितले आहे. मानवाचे वरील विचार-धन समृद्ध करून व्यक्तिस्वातंत्र्याचा प्रश्न सोडविण्यासाठीं यापुढें पुढील चार विचारावर लक्ष केंद्रित होणे जरूर आहे :

( १ ) समूहवादी अगर स्पर्धाप्रधान अर्थव्यवस्था जाऊन तेथें सहकारी अर्थव्यवस्था प्रस्थापित झाली पाहिजे.

( २ ) पक्षनिष्ठ राजकारणामुळे व्यक्तिस्वातंत्र्य धोक्यात येत असल्यामुळें राजकीय क्षेत्रात नवी पक्षातीत लोकशाही बलशाली ठरली पाहिजे.

( ३ ) समष्टिवाद अगर चुरस यावर आधारलेले शिक्षणाचे तत्त्वज्ञान बदलून मानवी सहकार्यावर उभारलेले शिक्षणाचें नवे निरामय तत्त्वज्ञान आपण अंगिकारले पाहिजे.

( ४ ) तंत्रविद्येतील शोध व आर्थिक आणि राजकीय क्षेत्रातील नवें विचार यामुळें राज्याकडे सत्तेचें अमर्याद केंद्रीकरण होत चालले आहे. हें थाबविण्यासाठीं स्थानिक स्वराज्य सस्थाना मुबलक स्वायत्तता दिली पाहिजे. ही विकेंद्रित लोकसत्ता व्यक्तिस्वातंत्र्याचे आश्वासन देऊ शकेल.

वरील सर्व विवेचन करतांना 'मानव हाच सर्व मूल्याचा मानदड आहे' हा पचवीसशे वर्षांपूर्वी प्रोटॅगॉरसने सांगितलेला मूलभूत विचार गृहीत धरलेला आहे. पुढील सर्व चर्चा याच दृष्टिकोनातून केली आहे.

मर्यादित पृष्ठसंख्येमुळे पुस्तकामध्यें व्यक्तिस्वातंत्र्याशीं निगडित असलेल्या सर्वच विचारांचा परामर्ष घेणे शक्य नव्हतें. शिवाय प्रत्येक विचार विस्तारानें

निरूपणे अशक्य होतें. त्यामुळें विवेचनांत त्रोटकपणा येणें स्वाभाविक आहे. पुस्तकाच्या उत्तरार्धातील विचारामध्यें क्वचित् प्रसंगीं अभिनिवेश डोकावत असला तरी सर्वत्र माझी मूळ भूमिका एका नम्र अभ्यासकाची आहे. ही चर्चा म्हणजे केवळ 'प्रकट चिंतन' मानून समीक्षकानीं विधायक टीका केल्यास मी त्याचे मनापासून स्वागत करीन.

माझे हें छोटेखे पुस्तक पुणे विद्यापीठाच्या बहिःशाल शिक्षण मंडळानें आपल्या ग्रंथमालेंत प्रकाशित करण्यासाठीं स्वीकारल्याबद्दल मंडळाचे मी मनःपूर्वक आभार मानतो. विशेषतः या ग्रंथाचे परीक्षक श्री. ना. ग. गोरे आणि चिं. ग. कर्वे यांनीं ज्या बहुमोल सूचना केल्या त्याबद्दल मी त्याचा ऋणी आहे. बहिःशाल शिक्षण मडळाचे सचिव डॉ. अ. वि. नाईक यानीं प्रकाशनाच्या कामीं प्रथमपासून शेवटपर्यंत जें आत्मीयतेनें सहकार्य दिलें त्याबद्दलहि मी त्याच्या ऋणाचा उल्लेख कृतज्ञतापूर्वक करू इच्छितो. माझे मूळ हस्तलिखित वाचून मला उपयुक्त सूचना केल्याबद्दल पुणें विद्यापीठातील राज्यशास्त्र विभागाचे प्रमुख डॉ. ना. रा. देशपांडे, एम् ए., पी.एच्. डी. (कोलंबिया) यांचा मी ऋणी आहे. त्याच प्रमाणे पुस्तक लिहित असतांना माझे स्नेही श्री. स. मा. गर्गे—सहसंपादक सकाळ, प्रा. व. चिं. जोशी—वाडिया कॉलेज व प्रा मधुकर नामजोशी—गोखले इन्स्टिटयूट, याच्याशीं केलेल्या चर्चेचा मला फायदा झाला आहे. 'कल्चरल असोसिएशन' पुढें या पुस्तकातील काहीं भाग मी वाचला होता. या मडळाच्या सदस्यानीं त्यावर उद्बोधक आणि उपयुक्त चर्चा केली. औपचारिकपणाचा दोष पत्करूनवरील सर्वांचे मी आभार मानतों. त्याचप्रमाणे प्रेस कॉपी तयार करून, प्रुफें तपासून, शुद्धिपत्र व संदर्भसूचि तयार करण्याच्या किचकट कामीं लेखनकेंद्राचे संचालक व माझे स्नेही श्री. रा. बा. कुलकर्णी आणि श्री. कान्तीलाल जबडे यांनीं केलेल्या मदतीबद्दल मी त्यांचाही आभारी आहे.

गोखले इन्स्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स
अँड इकॉनॉमिक्स, 'वसतिगृह' पुणें ४.
१५ फेब्रुवारी १९५५.

मा. प. मंगुडकर.

# अनुक्रमणिका

## भाग पहिला

भाग दुसरा

# समूहवाद

## मानवी इतिहास हा स्वातंत्र्याच्या आकांक्षेचा इतिहास

मानवी इतिहास हा मुख्यतः त्याची ज्ञानलालसा आणि स्वातंत्र्याकांक्षा यांचा इतिहास आहे. गुहेमध्ये राहणाऱ्या आणि वल्कले नेसून गिरिकंदरामध्ये हिंडणाऱ्या आदिमानवापासून तो आजच्या विज्ञाननिष्ठ संस्कृतीमधील अद्ययावत् मानवापर्यंत वरील दोन्ही मूलगामी प्रवृत्ति त्याच्या सर्व हालचालींच्या मुळाशी आहेत. अनेक शतके गेली तरी त्याची स्वातंत्र्याची आस अद्याप शमलेली नाही आणि त्याच्या त्यासाठी चालणाऱ्या झगड्यालाही अद्याप पूर्णविराम मिळाला नाही. स्वातंत्र्यासाठी चालणाऱ्या मानवी प्रयत्नाचे स्थूल मानाने खालील प्रमाणे दोन प्रकार पाडता येतील:—

( १ ) भौतिक स्वातंत्र्य—

( अ ) निसर्गापासूनचे स्वातंत्र्य, आणि

( आ ) समाजसंस्थापासूनचे स्वातंत्र्य.

( २ ) आध्यात्मिक स्वातंत्र्य

( आत्म्याचे देहापासूनचे स्वातंत्र्य. )

सृष्टिशास्त्रांत मानवाने प्राचीन, मध्य आणि अर्वाचीन युगांत जे शोध लावले, त्याचा त्याला स्वातंत्र्यासाठी उपयोग झाला आहे. निसर्गामध्ये अनेक अज्ञात आंधळ्या शक्ति आहेत. त्या माणसाला नष्टप्राय तरी करून टाकतात किंवा त्याच्या स्वातंत्र्याला मर्यादा तरी घालतात. निसर्गातील पंचमहाभूते जागजागी त्याच्या कर्तृत्वाला बांध घालीत होती. महासागर, महापूर, त्याच्या हालचाली रोखीत होती. शास्त्रज्ञानी निसर्गातील आंधळ्या शक्तींची मर्मस्थाने ओळखून त्यांना आपल्या कह्यात आणले. त्याचप्रमाणे विश्वावर नियंत्रण करणारे कांही मूलगामी सिद्धांत त्याने शोधून काढले. आर्किमिडिज,ब्रूनो, गॅलिलिओ न्यूटन,डॉर्विन, आइन्स्टाइन, इ. शास्त्रज्ञांनीं पदार्थशास्त्र, प्राणिशास्त्र, रसायनशास्त्र, गणित इत्यादि विज्ञानाच्या शाखांत मौलिक संशोधन करून मानवाला निसर्गापासून स्वातंत्र्याचें

आश्वासन दिले. सृष्टिशास्त्रज्ञाने मानवाची स्वातंत्र्यतृष्णा शमविण्याचे महनीय कार्य केले आहे.

सृष्टिशास्त्रज्ञाप्रमाणे समाजशास्त्रज्ञानी देखील मानवाचे स्वातंत्र्याचे स्वप्न साकार करण्यासाठी अहर्निश धडपड केली आहे. त्याच्या सर्व हालचाली मध्ये हे स्वच्छ प्रतिबिंबित झाले आहे.

मानवाने अगदीं प्राचीनकालापासून राज्यसंस्था, लग्नसंस्था, कुटुंबसंस्था इ० विविध समाजसंस्था निर्माण केल्या. त्याने निर्माण केलेल्या या संस्थामुळे त्याचा अव्यवस्था, गोंधळ यांच्यापासून बचाव झाला आणि त्याला मर्यादित अर्थानें स्वातंत्र्य मिळाले. परंतु त्याचबरोबर त्याच्यावर त्याने निर्मिलेल्या समाजसंस्थांची बंधने पडूं लागलीं. त्यामुळें त्याचे स्वातंत्र्य संकुचित झाले. या संस्थांपासून जास्तीत जास्त बंधमुक्त व्हावे म्हणून त्याची धडपड सुरू झाली. प्राचीन, मध्य आणि अर्वाचीन युगांत समाजशास्त्रामध्ये विविध सिद्धान्त आणि विचारप्रणाल्या पुढे आल्या. राज्यशास्त्रामध्ये अराज्यवादी, व्यक्तिवादी आदर्शवादी, साम्यवादी इ० विचारशाखा जन्माला आल्या. नाना प्रकारच्या राज्यघटना त्याने शोधून काढल्या. या त्याच्या सर्व वैचारिक झगडयामागें माणसाची स्वातंत्र्याची आकांक्षा होती. या झगडयाप्रमाणे समाजव्यवस्थेंत मोठमोठ्या चळवळी आणि स्थित्यंतरे झाली. मध्ययुगांत युरोपमध्यें नवजीवनाची आणि सुधारणेची चळवळ झाली. १७-१८ व्या शतकांत तेथे औद्योगिक क्रांति झाली. त्याचप्रमाणें इ. स. १७८९ मध्यें फ्रान्समध्ये मोठी राज्यक्रांति झाली. या औद्योगिक आणि फ्रेंच राज्यक्रांतीप्रमाणे इंग्लंडमध्ये रक्तशून्य राज्यक्रांति, अमेरिकेमधील स्वातंत्र्ययुद्ध, रशियामध्ये साम्यवादी क्रांति झाली. या सर्व प्रचंड स्थित्यंतरामागे मानवाची स्वातंत्र्यलालसा ही प्रामुख्याने कार्य करीत होती. त्याच्या स्वातंत्र्यावर बंधनें पडत आहेत असे त्याला वाटले की तो बंधमुक्त होण्यासाठी नव्या जीवननिष्ठा शोधूं लागतो किंवा समाजव्यवस्थेंत आमूलाग्र बदल करूं इच्छितो. या दृष्टीनें मानवाचा हा इतिहास त्याच्या स्वातंत्र्याकांक्षेचा इतिहास आहे असे म्हणायला कांहींच हरकत नाही.

निसर्गशास्त्रज्ञ आणि समाजशास्त्रज्ञ याच्याप्रमाणे धर्मशास्त्रज्ञ देखील विशिष्ट अर्थानें स्वातंत्र्याचे उपासक आहेत. म्हणजे मानवाचा नुसता

भौतिकच नव्हे तर आधिभौतिक विचार देखील स्वातंत्र्याच्या बिंदू-भोवतीं गुफलेला आहे. अर्थात् धर्मशास्त्रज्ञांना जे स्वातत्र्य हवे आहे ते निसर्ग किंवा समाज याच्यापासून नव्हे तर खुद्द मानवाच्या शरीरापासूनच होय ! मनुष्य युगानुयुगे जन्ममृत्यूच्या फेऱ्यात सापडला आहे. पापपुण्याच्या कर्मबंधामुळे मनुष्याचा आत्मा या क्षणभगुर ससारामध्ये अडकला आहे. काम, क्रोध, लोभ इ०च्या आहारी गेल्यामुळे मनुष्याचा आत्मा निष्कारण इहलोकाच्या बधनात गुतला आहे. तो जोपर्यंत अशा प्रकारें शरीरात कोंडला गेला आहे तोपर्यंत तो बंधमुक्त झाला असे मानताच येणार नाही मानवाला या बंधनाच्या पलीकडे गेले पाहिजे. त्याच्या पलीकडे आत्म्याच्या स्वातंत्र्याचे अफाट विश्व आहे. आत्म्याचें असे स्वातंत्र्य–मोक्ष मिळविणे हे त्याच्या जीवनाचें मुख्य कार्य आहे असा अध्यात्मवाद्याचा विचार आहे. गौतमबुद्ध, महावीर, निरनिराळे ऋषी, तपस्वी, शकराचार्य, सत इत्यादि सर्व या स्वातत्र्याच्या शोधात होते. रानावनात, मदिरात, तपश्चर्येत हे सर्व आत्म्याच्या मुक्तीचा मार्ग धुडाळीत होते. गौतमबुद्ध तर म्हणत असे, आत्म्याचा पक्षी शरीराच्या पिंजऱ्यात अडकला आहे तो इतर पक्षा-प्रमाणे स्वातत्र्याच्या अमर्याद आकाशात डौलाने विहरूं लागला पाहिजे. शंकराचार्य देखील सागत, जग ही एक माया आहे. मनुष्य या मायेत गुरफटला जातो म्हणूनच त्याला ब्रह्माशीं एकरूप होता येत नाही. आणि तो ब्रह्माशीं तद्रूप होत नाहीं तोपर्यंत त्याला मुक्ति मिळूं शकत नाहीं. बुद्ध आणि शकराचार्याप्रमाणे इतर बहुतेक सर्व धर्मीयानी आत्म्याच्या स्वातत्र्याची महती गायलेली आहे. जगातील मानवाच्या अशा सर्व आधि-भौतिक हालचालीच्या मुळाशीं देखील स्वातत्र्याची कल्पना प्रभावी रीतीने प्रत्ययाला येते. मानवाची ही पारलौकिक स्वातत्र्याची कल्पना बरोबर की चुकीची हा मुद्दा अलाहिदा ! ते स्वातंत्र्याचे अभिलाषी आहेत यांत शका नाहीं. निसर्गशास्त्रज्ञ, समाजशास्त्र, धर्मशास्त्रज्ञ हे प्राचीन, मध्य आणि अर्वाचीन युगात मानवाच्या स्वातत्र्यासाठीं झगडत आहेत. या तिन्ही क्षेत्रांतील मानवाचा इतिहास हा त्याच्या स्वातत्र्याच्या लढ्याचा इतिहास आहे.

माणसाच्या या सर्व इतिहासाचा धांवता आढावा घेतला तरी या

इतिहासाच्या मुळाशीं त्याची स्वातंत्र्याकांक्षा धगधगत असल्याचे आपणास दिसून येईल. या इतिहासाच्या अन्वयार्थाला साम्यवाद्यांचा कडाडून विरोध होणार हे अगदीं उघड आहे. कारण साम्यवाद्यांच्या मताप्रमाणे मानवी इतिहास हा प्रामुख्याने वर्गयुद्धाचा इतिहास आहे. मार्क्सने इतिहासाचा साम्यवादी अर्थ स्पष्ट करण्यासाठीं संबंध मानवी इतिहासाचे पांच कालखंड पाडले (१) शासनसंस्थेच्या उदयापूर्वीचा काल (Prestate Society) (२) गुलामगिरी (३) सरंजामशाही (४) भांडवलशाही (५) साम्यवादी समाज व्यवस्था.

मार्क्सच्या मताप्रमाणे मानवी इतिहास या अवस्थामधून प्रगत होत असून या प्रत्येक कालखंडामध्ये सौम्य-तीव्र प्रगट—अप्रगट वर्ग युद्ध चालू आहे. उत्पादनाच्या साधनाचा मालक आणि श्रमाशिवाय कोणतेच भांडवल नसणारा मजूर, कारागीर यांच्यामध्ये हा सतत संघर्ष चालू असून वर्गविग्रह किंवा वर्गयुद्ध ही मानवी इतिहासाची प्रकृति आहे. मानवी इतिहासांतील अनेकविध झगड्यांचा अभ्यास करून देखील त्यानें हेंच प्रतिपादले कीं माणसाच्या इतिहासाचे केंद्रस्थान वर्गयुद्ध आहे व बाकीचा त्याचा व्यवहार हा याच बिंदूभोंवतीं पसरलेला व्यापक परिघ आहे.

मार्क्सच्या या इतिहासात थोडेफार तथ्य आहे. परंतु हा त्याचा अर्थ निर्दोष आणि मूलग्राही वाटत नाही. कारण या सर्व कालखंडात ही वर्गयुद्धे चालत आलीं हे मान्य केले तरी या वर्गयुद्धाच्या मुळाशीं कोणती प्रेरणा होती? वर्गयुद्ध मानवाचे साधन होते. परंतु त्याचे साध्य कोणते होते? वर्गयुद्धाच्या साधनाचा वापर त्याला स्वातंत्र्याच्या साध्यासाठींच करायचा होता ना? मग मानवी इतिहास हा वर्गयुद्धाचा इतिहास आहे असे एकांतिक विधान करणे कितपत उचित ठरेल? वर्गयुद्धाच्या तळाशीं आपणांस मानवाची स्वातंत्र्यलालसा प्रत्ययाला येत असल्यामुळे मानवी इतिहास हा मुख्यत्त्वे त्याच्या स्वातंत्र्य—कांक्षेचा इतिहास असेंच म्हणणे अधिक सार्थ ठरेल.

ज्या स्वातंत्र्याची अभिलाषा तो गेलीं अनेक शतकें बाळगीत आहे तीच स्वातंत्र्याची लालसा तो भविष्यातही बाळगणार यांत काय संदेह? गेल्या अनेक शतकाप्रमाणें पुढील काळांतहि मानवाची दृष्टि मुख्यतः बंधमुक्त

स्वातंत्र्य संपन्न जीवनावर खिळलेली राहणार ! त्याच्या भविष्याच्या वाटचालीसाठीं त्याच्या भूतकाळाचा परामर्श घेणे आवश्यक असते. भूतकाळातील अनुभवापासून धडे घेऊन भविष्याची निर्मिति आपणास करायची असते. या दृष्टीने माणसाने व्यक्तिस्वातत्र्यासाठीं केलेल्या वैचारिक प्रवासाचा ओझरता परिचय आपणास हितप्रद ठरणार आहे

'सर्वांगीण स्वातत्र्य' हे जरी मानवी इतिहासाच्या केंद्रस्थानीं असलें तरी स्वातत्र्य या शब्दाचा अर्थ व ते प्राप्त करण्याचीं साधने याबाबत विचारवतात मूलग्राही मतभेद आहेत. गेल्या अडीच हजार वर्षांतील विचारप्रवाहाचा आढावा घेतला तर स्थूल मानाने आपणास दोन प्रमुख विचारशाखा राज्यशास्त्राच्या इतिहासात दिसून येतील. एक वर्ग समूहवादाचा आश्रय करतो व त्यातच व्यक्तिस्वातत्र्य विकासित होईल असे मानतो. या वर्गात सामान्यतः प्लेटो, हेगेल, नित्से, कान्ट, ग्रीन, बोसॅन्के इ० आदर्शवादी, व मार्क्स, लेनिन, स्टालीन इ० साम्यवादी याचा अतर्भाव होतो. व्यक्ति गौण मानून समूहाला श्रेष्ठ मानणे हे या विचारशाखेचे मध्यवर्ती सूत्र आहे.

दुसरा विचारवताचा गट हा व्यक्तिवादी असून त्यात प्रॉटेगॉरस, इपिक्यूरस, सिसरो, मध्ययुगातील नवजीवनाच्या चळवळीचे नेते, बॅन्थॅम, जॉन स्टुअर्ट मिल, स्पेन्सर, म० गाधी याचा प्रामुख्याने अतर्भाव होतो. त्याचप्रमाणे टॉलस्टॉय, रस्किन, प्रिन्स क्रोपोटन, इ० अराज्यवाद्याचाहि समावेश होतो. हा वर्ग 'व्यक्ति हा प्रत्येक गोष्टीचा मानदड आहे' या तत्त्वावर आपली अढळ निष्ठा व्यक्त करतो व त्यावर सर्व भर देतो. व्यक्ति स्वातत्र्याचे ध्येय साकार करण्यासाठीं गेल्या २५०० वर्षांतील वरील दोन्हीं विचारशाखाचे मूलभूत मतभेद आपणास अभ्यसनीय आणि मार्गदर्शक ठरणार आहेत.

**समूहवादाचा जनक प्लेटो**— (इ. स. पू. ४२७ ते इ. स. पू ३४७)

राज्य आणि व्यक्ति याचे अन्योन्य सबध कसे असावेत यासबधीचा विचार सोफिस्ट विचारवत प्रॉटॅगॉरस, साक्रेटिस इ०नी थोड्याफार प्रमाणात केला होता. यरिपिडस पेरिक्लस याच्या नाटकातून व भाषणांतून या सबधीचे धांवते, पुसट उल्लेख आढळतात. परतु वरील दोन्हींच्या सबधाचा सखोल

अभ्यास करून त्याला शास्त्राची प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा पहिला राज्यशास्त्रज्ञ प्लेटो हाच होय. याने आपल्या जीवनाला सुरुवात केली ती सोफिस्ट सॉक्रेटिसाच्या व्यक्तिवादापासून ! परतु सॉक्रेटिसाचे वैचारिक ऋण घेऊन विचार प्रक्रियेला सुरुवात करणारा हा विचारवंत निष्कर्षाला आला मात्र समूहवादाच्या ! त्याच्या सर्व राजकीय विचारामधील अत्यत महत्त्वाचा भाग म्हणजे त्याची ' तत्त्वज्ञ राजा 'ची कल्पना ! प्लेटोने राज्यामधील सर्व सत्तेचे केंद्रीकरण या ' तत्त्वज्ञ राजा 'च्या हातात झाले पाहिजे असे आग्रहाने प्रतिपादिले आहे. व्यक्तीच्या सार्वभौमत्त्वावर किंवा सत्ताविकेंद्रीकरणाच्या लोकशाहीप्रवण तत्त्वावर त्याचा यत्किंचितही विश्वास नाहीं. अमर्याद सत्ताकेंद्रीकरण आणि ते देखील एखाद्या ' तत्त्वज्ञ–राजा ' च्या हातांत हे त्याच्या शिकवणुकीचे सार आहे.

## प्लेटो समूहवादी कां बनला ?

मानवी विचाराना त्याची स्वतत्र गतिमानता असते (Ideas have their own dynamics.) हे खरे, परतु त्याचबरोबर काहीं प्रमाणांत भौतिक परिस्थितीचा देखील त्याच्यावर परिणाम घडत असतो. या दृष्टीने प्लेटोच्या विचारसरणीचा अभ्यास झाला पाहिजे. लोकशाहीबद्दल अनादर व सत्ता केंद्रीकरणाचा आग्रह या प्लेटोच्या विचाराला मुख्यतः तीन घटना कारणीभूत झाल्या. एकतर सॉक्रेटिस हा प्लेटोचा गुरु. छळ आणि हालअपेष्टा सोसून सामान्य लोकाना त्याने ज्ञान दिले. अथेन्समधील बहुजनसमाजाने त्याची परतफेड म्हणून त्याला विषाचा प्याला दिला व जगातून नष्ट केलें. अथेन्समधील ' प्रत्यक्ष लोकशाही 'ला आलेले विषारी फळ म्हणजे सॉक्रेटिसाची देहान्ताची शिक्षा हे होय ! दुसरे,अथेन्सचे पूर्वीचे वैभव घसरगुडीला लागले होते. स्पार्टा व इतर ठिकाणच्या हल्ल्यामुळे ते खिळखिळे झाले होते. एका ठिकाणीं सत्ताकेंद्रीकरण न झाल्याने अथेन्सचे राज्य कोसळत आहे असे त्याला वाटत होते व तिसरे म्हणचे प्लेटोचा जन्म आणि वाढ ही खानदानी घराण्यात झाली होती. सामान्य माणसाबद्दल आत्मीयता किंवा जिव्हाळा वाटावा असे सस्कार त्याच्या मनावर या काळांत होऊं शकले नाहींत. प्लेटोच्या राज्य आणि व्यक्ति यांच्यासंबंधीच्या विवेचनाचा

विचार करतांना वरील पार्श्वभूमि लक्षात ठेविली म्हणजे त्याच्या विचाराची घडण आपण लवकर समजू शकू.

राज्याच्या सोयीसाठी प्लेटोने समाजाची तीन गटात विभागणी केली. राज्यकर्ते, सैनिक आणि सामान्य जनता. हे तिन्ही गट अनुक्रमे त्या काळच्या समजुतीप्रमाणे सोने, चांदी आणि लोखड यांचे बनविलेले असत. प्लेटोच्या मताप्रमाणे राज्याचे वरील तिन्ही घटक हे पाडित्य किवा बुद्धिमत्ता, पराक्रम आणि श्रम यांचे प्रतिनिधी होत. ' राज्यकर्त्या ' वर्गातून ' तत्त्वज्ञ राजा ' निवडायचा आणि त्याला सार्वभौमत्व अर्पण करायचे, सैनिकांनीं आपल्याकडील क्षात्रियाप्रमाणे समाजरक्षण करायचे, श्रमिकांनीं मुख्यतः सेवाधर्म पत्करायचा. प्लेटोच्या या विभागणीत राज्यकर्त्यांना (Guardian) अत्यत महत्त्व आहे. त्यातहि विशेषतः ' तत्त्वज्ञ राजाची ' त्याची कल्पना अभिनव आणि विचारार्ह आहे.

## ' तत्त्वज्ञ राजा ' ची कल्पना

' तत्त्वज्ञ राजा 'ची कल्पना विशद करताना प्लेटो म्हणतो, " जोपर्यंत तत्त्वज्ञ राजे बनणार नाहींत किवा जोपर्यंत राजे आणि राजपुत्र याच्या अगीं तत्त्वज्ञान ग्रहण करण्याची पात्रता व मनोभूमिका असणार नाही, तोपर्यंत नगरराज्ये दोषमुक्त होणार नाहींत. इतकेच नव्हे तर अखिल मानव जातीला सुख लाभणार नाहीं. " तत्त्वज्ञ राजाच्या या कल्पनेवर भर देताना तो म्हणतो, हा राजा सर्वगुणसपन्न असला पाहिजे. स्वार्थ, अहकार उथळपणा त्याच्या अगीं असणार नाही. त्याचे मन आणि बुद्धि यांचा चागला विकास झालेला असेल. राजाला आपल्या कारभारात आणि निर्णयांत वस्तुनिष्ठ राहता यावे म्हणून प्लेटोने त्याच्यासाठीं पैसा आणि स्त्रिया यांचा साम्यवाद सागितला आहे. खाजगी मालमत्तेतून निर्माण होणारा कलह व बायका-मुलामुळे वाटणारे मायेचे पाश त्याच्या निर्विकल्प मनाला बाधूं नयेत म्हणून त्याने साम्यवाद सागितला आहे या साम्यवादामुळे त्याच्या सहजप्रवृत्तीचे उदात्तीकरण व्हावें हा त्याचा हेतु. अशा राजाच्या हातांत समाजाची सर्व सत्ता सोपविली तर व्यक्तिस्वातत्र्य संवर्धित होईल व समाजव्यवहार सुरळीतपणे चालतील ही त्याची कल्पना.

## ' तत्त्वज्ञ राजा ' च्या कल्पनेंतील दोष

व्यक्ति आणि समष्टि यांचें हितरक्षण करणाऱ्या त्याच्या तत्त्वज्ञ राजाच्या कल्पनेत मुख्यतः खालील चार दोष आहेतः—

( १ ) राज्यकर्त्या वर्गामधून 'तत्त्वज्ञ राजा' निवडावा असे त्यानें म्हटले आहे परंतु अशी निवड अचूक आणि फलदायी होईल कां ? यासाठीं आपणांस कोणता वस्तुनिष्ठ निकष प्लेटोने दिला आहे ? ही निवड जर लहरीनुसार होणार असेल तर त्यात चांगल्या सर्जनशील शक्ति असलेली माणसे डावललीं जाणे शक्य नाहीं कां ? त्याच्या राजाच्या निवडीला अधिष्ठान कोणते ?

( २ ) हा ' तत्त्वज्ञ राजा ' बुद्धिमान्, कर्तबगार असला तरी सर्व प्रश्न त्यामुळे सुटतात का ? तो तैलबुद्धीचा तत्त्वचिंतक असला म्हणजे त्याला जनहिताची काळजी असेलच असे आपणास गृहीत धरून कसे चालेल ? सत्तास्पर्धा, आंधळा स्वार्थ, इ. काहीं मानवी प्रवृत्ति त्याच्या मूळच्या सन्मार्गापासून त्याला परावृत्त करणार नाहींत याची हमी कशी द्यायची ?

( ३ ) त्याच्या आदर्श राज्यात सांस्कृतिक प्रगति कितपत होणार याबद्दल शंकाच आहे. कारण सामान्य जनता केवळ शारीरिक कष्टातच आपली शक्ति खर्च करणार. सैनिकाना युद्धकलेत नैपुण्य मिळविण्यापलीकडे इतर गोष्टी पाहतां येणार नाहींत. आणि ' तत्त्वज्ञ राजा 'ची जन्मापासून प्रौढावस्थेपर्यंत ज्या सांचेबद्द पद्धतीनें वाढ होणार त्यामध्ये त्याच्याकडून देखील कला, वाङ्मय, संस्कृति यांचा विकास होईल असे वाटत नाही. सांचेबद्द व्यक्तित्त्व आणि विचार मानवी संस्कृतीला हानिकारकच ठरण्याचा संभव अधिक.

( ४ ) वरील तिन्हीहून चवथा महत्त्वाचा आक्षेप असा कीं सत्ता एका व्यक्तीच्या हातात केंद्रित करण्यामध्ये त्यानें असे गृहीत धरले आहे कीं सामान्यः माणसे ही विवेकसंपन्न व्हावयास अपात्र आहेत. त्याच्या हातीं सोपविलेल्या सत्तेचा दुरुपयोग हा होणारच. लोकशाहीचे तत्त्वज्ञान याच्या अगदीं उलट अशा गृहीतकृत्यावर उभारले आहे. प्रत्येक व्यक्तीमध्ये अमर्याद सर्जनशील शक्ति आहे. प्रत्येक मनुष्य मुख्यतः बुद्धिप्रामाण्यवादी आहे. ( Man

is a rational being ) प्रयत्नाने प्रत्येक मनुष्याला आपण विवेकी आणि जबाबदार करूं शकतो. लोकशाही विचाराची ही बैठकच प्लेटोच्या तत्त्वज्ञ राजा ' च्या कल्पनेच्या अगदीं उलट आहे. सामान्य माणसे राज्य करायला अपात्र आहेत ही प्लेटोची कल्पना लोकशाहीच्या तत्त्वार्शी सपूर्णपणें विरोधी आहे.

प्लेटोच्या वरील 'तत्त्वज्ञ राजाच्या' कल्पना किवा प्रजासत्ताक राज्याचे स्वप्न ही आज आपणास मान्य होऊ शकत नाहींत. सत्तेचे अमर्याद केंद्रीकरण हे व्यक्तिस्वातत्र्याला हानिकारक आहे. समष्टि आणि व्यक्ति याच्यांत सवादित्व निर्माण करायचे झाले तर प्रत्येक व्यक्तीमधील क्रियाशीलतेवर आपला अभग विश्वास पाहिजे व त्याच्यातील बुद्धिप्रामाण्यावर आपणास अवलबून राहिले पाहिजे. एकाच्या हातांत—मग तो तत्त्वज्ञ राजा असला तरी—सर्व सत्ता केद्रित करून हा प्रश्न सुटणार नाही.

प्लेटोनतर इ. स. पूर्वीच्या ४ थ्या शतकापासून तो पहिल्या शतकापर्यंत उल्लेखनीय असा कोणी समूहवादी राज्यशास्त्रज्ञ झाला नाहीं. इ. स.च्या पहिल्या शतकापासून चवथ्या शतकापर्यंत युरोपमध्ये खिश्चन विरुद्ध खिश्चनेतर याच्यात सतत तुबळ युद्ध चालू होते. साहाजिकच याही काळात कोणी विचारवत पुढे आला नाही. परतु पाचव्या शतकाच्या प्रारभीच सेट ऑगस्टिन हा धर्मनिष्ठ राज्याचा पुरस्कर्ता पुढे आला आणि त्याने सत्ता केद्रीकरणाचे तत्त्वज्ञान सुस्थिर केले.

## सेट ऑगास्टिन ( इ. स. ३५४ ते ४३० )

इ. स. ४१० मध्ये टयूटॉनिक रानटी टोळयानी रोमवर हल्ले करून हे साम्राज्य खिळखिळे करून टाकले. इ. स. च्या १ ल्या शतकापासून खिश्चन धर्माच्या वर्चस्वाच्या झगड्यास सुरुवात झाली होती. या काळापर्यंत हा धर्म रोमन साम्राज्यात बराच खालवर गेला होता. टयूटॉनिक टोळ्यापुढे रोमन समाजव्यवस्था टिकू शकली नाही. अशा काळात सामान्य लोकाना वाटू लागले कीं, आपली समाजव्यवस्था कोलमडत आहे, आपला सतत पराभव होत आहे. आपण सारखे नाशाकडे चाललो आहोत. कारण आपल्यावर खिश्चन धर्माचा पगडा बसत आहे. हा विचार जनमनांत मूळ

धरीत असतांनाच सेंट ऑगस्टीन हा पुढे आला व डळमळीत धर्मसत्ता त्याने मजबूत केली.

## निरंकुश धर्मसत्तेचा पुरस्कार

त्याच्या सर्व विचाराचे सार असे की धर्म ही संस्था मानवी समाजात सर्वात बलिष्ठ आणि मध्यवर्ती असून माणसाने आपले सर्व सार्वभौमत्व, बुद्धि, कला इ. तिला अर्पण करावे. राज्य हे देखील धर्माधिष्ठित असले पाहिजे धर्मातीत राज्य मानवाला विनाशाकडे नेते. अशा राज्यात बडाळी, रक्तपात, लूटमार, दरोडे, खून इत्यादींना बहर येतो. शिवाय मानवी आत्म्याचा अध:पात होतो. उलट माणसाने धर्म ही संस्था केंद्रस्थानीं मानली म्हणजे त्याचे ऐहिक आणि पारलौकिक कल्याण होते. त्याचा हा विचार अत्यंत महत्त्वाचा आहे. प्लेटोने ' तत्त्वज्ञ राजा ' ला राज्याचे सर्व सार्वभौमत्व अर्पिण्यास सांगितले. ऑगस्टीनने ते धर्मसंस्थेला द्यायला सांगितले अमर्याद सत्ताकेंद्रीकरण हाच त्याच्या शिकवणुकीचा प्रत्यक्ष परिणाम ! ही सत्ता भोगणाऱ्या अर्थात्‌च काहीं थोड्या व्यक्ति राहणार ! त्या व्यक्तींकडून इतर सर्व समाजाचे स्वातंत्र्य जतन होईलच याची ग्वाही कोणालाही कधीही देता येणार नाहीं.

इ. स. च्या ५ व्या शतकापासून तो १२ व्या शतकापर्यंत युरोपमध्ये खिश्चन धर्माचा अत्यंत मोठा पगडा होता. सारे समाजजीवन थंड गोळ्या-सारखे चेतनाशून्य झाले होते. या अंधारयुगात तत्त्ववेत्ता जन्मणे शक्य नव्हते.

इ. स. च्या १२ व्या शतकानंतर युरोपमधील नवजीवनाची चळवळ सुरू झाली. त्या काळातील सर्व विचारप्रवाह व्यक्तिवादाकडे अधिक झुकत होता. त्यामुळे तेथून तो १८ व्या शतकापर्यंत प्लेटो आणि ऑगस्टिन यांची विचारपरंपरा चालविणारा प्रमुख विचारवंत कोणी झाला नाही. नंतर मात्र हेगेल हा या विचाराला एक फार मोठा तत्त्वचिंतक भेटला. त्याचे विचार-धन कोणालाहि नाकबूल करून चालणार नाही

## आदर्शवादी हेगेल ( इ. स. १७७० ते १८३१ )

एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीला हेगेलने आपले राष्ट्रवादी तत्त्वज्ञान

मोठ्या जोमाने मांडावयास सुरुवात केली. राज्य हे सर्वशक्तिमान् असून व्यक्तीने या शक्तीला आपले जीवित समर्पित करावें हा त्याच्या विचाराचा मुख्य आशय. राज्याच्या अमर्याद सत्तेचा त्याने पुरस्कार केला. याला इतर काही कारणाबरोबर त्या काळची जर्मनीची भौतिक स्थिति काहीं प्रमाणांत कारणीभूत होती. त्या परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर हेगेलचा राष्ट्रवादी विचार आपण लवकर समजू शकू.

वेस्टफालियाच्या तहानतर जर्मनी अत्यत दुबळा झाला होता. अनेक सरजामी सस्थानात तो भगला होता. मध्यवर्ती सत्ता तर अत्यत कमकुवत झाली होतीच. परतु छोटे छोटे मध्ययुगीन सस्थानाचे अवशेष देखील कमजोर झाले होते. त्या काळात पश्चिम युरोप आणि इग्लंडप्रमाणे प्रगति करायची म्हणजे प्रथम जर्मनीत बलवान् मध्यवर्ति सरकार स्थापणे आवश्यक होते. हेगेलने आपल्या आदर्शवादी विचाराने त्या काळाची जर्मनीची ही गरज भागविली. हेगेलने समष्टीचा अत्यत हिरीरीने पुरस्कार केला. याला दुसरे कारण म्हणजे याच काळात प्लेटोच्या समूहवादाने घेतलेली त्याच्या मनाची पकड. दोन्ही कारणाचा साकल्याने झालेला परिणाम म्हणजे हेगेलचा राष्ट्र-वादी विचार होय !

## आदर्शवादी तत्त्वज्ञान

हेगेलच्या आदर्शवादाचीं ( Idealism ) ढोबळ मानाने चार ठळक वैशिष्ट्ये सागता येतील.

( १ ) राज्य या कल्पनेला चैतन्यशक्तीचे ( Spirit of State ) अधिष्ठान आहे. किंबहुना त्या अमूर्त शक्तीचा मूर्त आविष्कार म्हणजे राज्य होय. राज्यामागील ही शक्ति अव्यक्त, अज्ञात आणि अनाकलनीय आहे. ती स्खलनशील असू शकत नाहीं. राज्यामागील चैतन्य सर्वसाक्षी व सर्व-शक्तिमान् आहे. राज्य हे या शक्तीचे केवळ माध्यम असल्याने या चैत-न्याचे सर्व गुण राज्याकडे येतातच. त्यामुळे राज्य देखील ओघानेच सर्व-सामर्थ्यसंपन्न बनते. त्याच्या या चैतन्याच्या कल्पनेमुळे हेगेलच्या राज्याला दैवी किंवा अतिमानवी स्वरूप प्राप्त झाले.

( २ ) राज्याचा नैतिक पाया खंबीर आहे. व्यक्तीच्या इच्छा—आकांक्षा

राज्याला अचूकपणे कळतात. नैतिक दृष्ट्या योग्यायोग्य कोणतें याचा निर्णय राज्य बिनचूकपणें घेतें. ( State is Self-Conscious ethical Substance ) राज्याच्या कोणत्याही निर्णयाबद्दल व्यक्तीने शंका घेणें चूक आहे.

( ३ ) राज्य हा एक सजीव मानवी देहच आहे. राज्यांतील व्याक्ति या देहातील पेशीप्रमाणे आहेत. पेशीना शरीरावांचून स्वतत्र अस्तित्व नाहीं. त्याप्रमाणे व्यक्तीला राज्यावाचून जीवन नाहीं. वृक्षापासून तोडलेल्या फांदीला मृत्यूवांचून दुसरा उपाय नाहीं, त्याप्रमाणे राज्यापासून दूर राहणाऱ्या व्यक्तीला आत्मनाशावाचून गती नाही. व्यक्तीने राज्यामध्ये संपूर्णपणे एकजीव होणे हे तिचे कर्तव्य आहे. साखर पाण्यांत सर्वस्वी विरघळून जाते, त्याप्रमाणे व्यक्तीने राज्यामध्ये आपले व्यक्तिमत्त्व विरघळवून टाकावे.

( ४ ) व्यक्तीमधील क्षात्रतेज जिवत ठेवायला युद्धे आवश्यक आहेत. राज्याच्या पराक्रमाचे युद्ध हे बाह्य निदर्शक आहेत. ( The state of war shows the omnipotence of the State in its individuality"

## आदर्शवाद व्यक्तिस्वातंत्र्याशीं विसंगत

हेगेलचा वरील चैतन्याधिष्ठित राष्ट्रवाद व्यक्तिस्वातत्र्याशीं विसवादी आहे हे स्पष्टच दिसते. त्याच्या विचारामध्ये पुढील धोके मोठे आहेतः—

( १ ) राज्यसस्था अव्यक्त, अमूर्त अनाकलनीय दैवी शक्तीचा आविष्कार आहे हे त्याचे म्हणणे कोणत्याही बुद्धिवाद्याला पटणार नाही. त्यामळ अशा ‘ राष्ट्रदेवते ’साठीं व्यक्तींनीं आपले जीवन समर्पण करावे हा विचार आज रुचण्यासारखा नाहीं. उलट राज्यसस्था किंवा इतर समाज संस्था या मानवाने आपल्या सोयीसाठीं निर्मिल्या आहेत. मनुष्य हा या सस्थाचा निर्माता असून सस्था या माणसाने उत्पन्न केलेल्या आहेत. निर्मित वस्तूने आपल्या निर्मात्याला आपले गुलाम बनविणे हा विरोधाभास चमत्कारिकच नव्हे, तर अत्यत घातक आहे. राज्य हे मानवाच्या उत्कर्षाचे साधन असून मानवाचा उत्कर्ष हे त्याचे साध्य आहे. साध्य आणि साधन यांचे हे सबंध आपण नीट लक्षात घेतले पाहिजेत. परतु हेगलनें आपल्या

विचारांत या दोन्हींची गल्लत केली. त्यानें मानवाला साधनें बनविली आहे राज्याला साध्य ठरविलें. हेगेलची ही चूक फार भयानक मानावी लागेल.

( २ ) व्यक्तीला स्वतत्रपणें अस्तित्त्व नाही. परतु त्यांच्या समूहांतून मात्र नवी राष्ट्रदेवता निर्माण होते हे तर्कशास्त्र न पटणारें आहे राज्याला देह-धारी पुरुषाची दिलेली कल्पना सिद्ध करणे अशक्य आहे.

( ३ ) राज्य हे त्याने अंतर्गत बाबतींत सर्वंकर्ष आणि सर्वसत्ताधारी कल्पिले आहे. राज्यामध्ये एके ठिकाणीं सर्व सत्ता केंद्रित झाली पाहिजे या त्याच्या विचारात एक मोठा धोका आहे. विचारात राज्य ही कल्पना कितीही अमूर्त असली तरी प्रत्यक्षात राज्य म्हणजे सरकार आणि सरकार म्हणजे काहीं चार दोन व्यक्तींचे मडळ किंवा एखादी व्यक्ति असाच अर्थ होणार. याचा अर्थ राज्याची मर्यादातीत, निरकुश सत्ता ही एखाद्या दुसऱ्या व्यक्तिची सत्ता ठरणार ! मनुष्य हा सर्वगुणसपन्न आणि सर्वज्ञानी असू शकत नाहीं. हा मनुष्य अधिकाराचा दुरुपयोग करून लाखोंचे जीवन धोक्यात आणणार नाहीं याला हमी नाहीं. उलट व्यक्तीमधील सत्तालालसा त्याला अधिकाराच्या सदुपयोगापेक्षा दुरुपयोगाकडे नेण्याचा सभव अधिक. अशा एका व्यक्तीच्या लहरीवर अगणित नागरिकाचे जीवन सर्वस्वी अवलबून असणे हितप्रद ठरणार नाही. ही केंद्रित सत्ता व्यक्तिविकासापेक्षां व्यक्तिविनाशाकडे नेईल.

( ४ ) अतर्गत बाबतीत ही आदर्शवादी कल्पना जशी नाशाप्रत नेईल, त्याचप्रमाणे आतरराष्ट्रीय राजकारणात ती प्रचड भूगोलयुद्धें आणि मानवाचा सर्वसहार घडवून आणील. प्रत्येक राज्य हे इतर राज्याशी वागताना तर सर्व-सत्ताधीश आहेच. परंतु हेगेलने, राज्याने वारवार युद्धे करून आपले क्षात्र-तेज इतराना दाखवावे, असे म्हटले आहे. जगाचे विशाल कुटुंब घडविण्याचे मानवाचे स्वप्न त्याच्या कल्पनेमुळें आज धूम्रवलयासारखें हवेत विरून जाईल. हैड्रोजन बॉम्बच्या आजच्या काळात राज्यानीं या कल्पनेचा पुरस्कार केला तर जगाचे एक प्रचंड थडगें होईल. अशा ठिकाणीं व्यक्तिस्वातंत्र्याचा विचार करणेंदेखील हास्यास्पद ठरेल.

हेगेलच्या या विचारांतून फॅसिझमचा उदय झाला आहे. मुसोलिनी, टोजो हीं हेगेलेचीच वैचारिक अपत्यें आहेत. त्यांच्या विचारांचा स्वतंत्र

प्रपंच करण्याची गरज नाही. त्याचप्रमाणे हेगेलबरोबर ब्रॅडले, बोसॅके, कान्ट, ग्रीन इ. आदर्शवादी थोड्याफार फरकाने याच विचाराचा अवलब करतात. त्याच्याही तत्त्वज्ञानाचा विस्तार अनावश्यक आहे.

## सामर्थ्यपूजक नित्शे ( इ. स. १८४४ ते १९०० )

हेगेलनतर एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात नित्से हा सर्वंकष सत्तेचा फार मोठा पुरस्कर्ता होऊन गेला.याच्या विचारातूनच पहिल्यामहायुद्धानतर जर्मनींतील नाझीवादाचा जन्म झाला.व्यक्ति आणि राज्य अगर समष्टि यांच्या परस्परसंबंधाबाबत नित्सेने मांडलेले विचार अत्यत महत्त्वाचे आहेत. त्याच्या विचाराचे सार तीन सूत्रात सांगता येईल—(१) लोकोत्तर पुरुषाचे Super men मानवावरील अधिराज्य, ( २ ) सामान्य माणसे आणि स्त्रिया यांच्याबद्दल आत्यंतिक तिरस्कार, व ( ३ ) वंशश्रेष्ठता. नित्सेचे सारे राजकीय तत्त्वज्ञान ' लोकोत्तर पुरुषा 'च्या कल्पनेभोवतीं गुफले गेले आहे. त्याच्या मते ' लोकोत्तर पुरुष ' हा मानवी जीवनांतील सर्वश्रेष्ठ क्षात्रतेजाचे प्रतीक असून, इतरावर अमर्याद सत्ता गाजविण्यासाठीं त्याचा जन्म झालेला असतो. सामर्थ्यपूजा हेच त्याचे जीवनकार्य असून दुर्बलाना अकित करणे किवा त्यांना नष्ट करणे हे त्याचे कर्तव्य आहे. उलट सामान्य माणसानीं या लोकोत्तर पुरुषाची पूजा करणे हेच त्यांचे जीवितसाफल्य आहे. आपल्या जीवनांतील सारसर्वस्व या लोकोत्तर पुरुषाच्या चरणीं अर्पून त्याची अनन्यभावाने उपासना करणे हेच त्यांचे आयुष्यातील महत्तम कार्य आहे. नित्सेच्या मते त्याच्या काळांतील हा लोकोत्तर पुरुष नेपोलियन बोनापार्ट होय. जगांतील क्षात्रतेज, पौरुष, पराक्रम याचे संरक्षण आणि सवर्धन करण्याची मुख्य जबाबदारी याच लोकोत्तर पुरुषावर असल्याने त्याने अधून मधून मोठी युद्धे केलीं पाहिजेत. त्यांतूनच दुर्बलांचा सहार होऊन वीरतेची जोपासना होईल.

## धर्म दुबळ्यांचे कैवारी !

सामर्थ्यहीन सामान्य माणसें आणि विशेषतः निर्बल स्त्रिया यांच्याविषयीं त्याचा तिरस्कार त्याच्या सामर्थ्यपूजेंतूनच निघाला आहे. त्याच्या Beyond

good and evil या ग्रंथांतून त्याने वरील दोघांवरही तुच्छतेचा आणि उपहासाचा वर्षाव केला आहे. त्यांच्याबद्दल त्याचा तिरस्कार इतका शिगेला पोचला आहे कीं केवळ सामान्य माणसाबद्दल आत्मीयता दाखविल्याबद्दल तो लाकेटिस, गौतमबुद्ध, येशूख्रिस्त यांच्याबद्दल अनादराने बोलतो बौद्ध-धर्म ख्रिश्चन धर्म किंवा इतर धर्म यानीं भूतदयेचा प्रचार केला व सामान्य माणसासाठी मुक्तीचा मार्ग मोकळा आहे असे सांगितले. यामुळे त्याचा या सर्व धर्मांबद्दल आदरभाव नष्ट झाला. सर्व माणसे समान आहेत. दयाळूपणा, विनम्रता, सहानुभाव, सद्‌गुण हे मानवी जीवनात श्रेष्ठ आहेत हे धर्मांनी सांगितले. नित्सेच्या मते धर्मांच्या या शिकवणुकीमुळे जगातील या सामर्थ्यांचे तेज नष्ट होईल व जग हा निर्बल शेळ्यामेंढ्यांचा कळप बनेल.

## स्त्रिया दुर्बलतेचें प्रतीक

सामान्य माणसापेक्षाही त्याला कमालीचा तिरस्कार कोणाचा असेल तर तो स्त्री-जातीचा. दुर्बलतेचे मूर्तिमत प्रतीक म्हणजे हा अबलांचा वर्ग आहे. यामुळे तो त्याना माणसाचा प्रतिष्ठित दर्जा देण्यास तयार नाही. आपल्या घरीं आपण माजरे, पोपट, वा कुत्री पाळतो त्यांतच याची आणखी एक भर एवढाच स्त्रियाकडे पाहण्याचा नित्सेचा दृष्टिकोन आहे. त्याना समाजभूमिकेवरून पुरुषानीं वागविणे हा वीरतेचा उपमर्द असून अध:पतित समाजाचे तें चिन्ह आहे असें त्याला वाटते. त्यामुळे त्याच्या दृष्टीने स्त्रियांचे जीवितातील सर्व-श्रेष्ठ कार्य म्हणजे पुरुषाना संभोगसुख देणे व प्रजोत्पादन करणे एवढेच आहे ! याबाबत वरील ग्रथांत तो म्हणतो, “ Man sall be trained for war and women for the recreation of the warrior. All else is folly ” दुर्बलतेचे मूर्तिमंत प्रतीक असणाऱ्या स्त्रियांपासून जगांतील सर्वश्रेष्ठ वीरता किंवा तेज जन्माला येत असते हे बिचाऱ्या नित्सेच्या शेवटपर्यंत ध्यानांत आले नाहीं.

वरील दोन्ही कल्पनांप्रमाणें वंशशुद्धीचा आणि वंशश्रेष्ठतेचा त्यांचा विचार महत्त्वाचा आहे. सामर्थ्यपूजा हा जसा माणसाच्या मोठेपणाचा निकष आहे, त्याचप्रमाणें रक्तशुद्धि हा त्याच्या श्रेष्ठतेचा मानदंड आहे. त्याच्या मतें सर्व मानवजातींत आर्यवंश उच्च असून त्यानें इतरांवर अधि-

राज्य गाजविणे हे त्याचें प्रधानकार्य आहे. या उच्च मानवसंघानें इतर नीच मानवकोटींतील स्त्रियांशीं लग्नसबंध ठेवूं नयेत. रक्ताची शुद्धता त्यामुळे नष्ट होईल. आर्यवंश आणि इतर वंश याचे संबंध मालक आणि गुलाम यांचेच राहणार.

हेगेल आणि नित्से हे दोन्ही निरकुश आणि अनियंत्रित सार्वभौमसत्तेचे पुरस्कर्ते. परतु हेगेल राज्याला दैवी सत्तेचे अधिष्ठान देतो, तर राज्याला हा बहुमान न देता नित्से लोकोत्तर पुरुषाकडे सर्व सत्ता अर्पण करतो. एक, लोकोत्तर पुरुषाचा पूजक आहे, तर दुसरा दैवी शक्तीचे प्रतीक असणाऱ्या नित्से राज्याचा उपासक आहे नित्सेची वंशश्रेष्ठत्त्वाची कल्पना देखील हेगेलमध्ये आढळत नाहीं. एवढा फरक सोडला तर दोघाच्या विचारात फारसा मूलभूत फरक फरक आढळत नाही. हेगेलमुळे या शतकांत जसा फासिझम् उदयाला आला त्याचप्रमाणे नित्सेमुळे नाझीवादाचा जन्म झाला. हेर हिटलर हा नित्सेच्या विचारसरणींचें परिणत स्वरूप आहे. व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने नित्सेच्या या विचाराचा परामर्श घेणे देखील अनावश्यक ठरणार आहे.

## नव्या हुकुमशाहीची मीमांसा

पहिल्या महायुद्धानतर हेगेल आणि नित्से यांच्या विचारांतून इटली आणि जर्मनीमध्यें फासिझम् आणि नाझिझम् यांचा विकास झाला. यांच्या समूहवादी विचाराची तत्त्वज्ञानात्मक बैठक वरील विचारवतांच्या विचारात होतीच. परतु त्याशिवाय १९२० च्या पुढे या विचारसरणींचा उदय वरील देशांत का झाला याची थोडक्यात मीमासा होणे आवश्यक आहे. व्यक्तिस्वातत्र्याच्या विनाशावर आधारलेल्या वरील दोन्ही वादांची मीमांसा तीन पद्धतीने केली जाते. ( १ ) मानसशास्त्र ( २ ) अर्थशास्त्र व ( ३ ) त्या देशाची भौतिक परिस्थिती.

## मानवाला श्रद्धास्थान हवे

हुकुमशाहीची मानसशास्त्रीय मीमांसा एरिक फ्रोम या लेखकानें आपल्या Fear of Freedom या ग्रंथांत केली आहे. त्याचें विवेचन मानवी इतिहासांतील सर्वच हुकूमशाही राज्यांना लागूं होण्यासारखें आहे. परंतु लेखकाच्या

समोर मुख्यतः वरील दोन्ही देश असल्यानें त्यांना त्यांची चर्चा अधिक लागू पडते. फ्रोमच्या मते माणसामध्यें भयगंड अनेक वर्षें वास्तव्य करीत असतो. माणसाला त्यामुळें या अफाट विश्वांत कोणत्या तरी कल्पनेचा, संस्थेचा वा व्यक्तीचा आधार हवा असतो. या अमर्याद विश्वाच्या पसाऱ्यात आपण एकटेच आहोत ही जाणीव सामान्य व्यक्तींना बेचैन करीत असतो. निरनिराळ्या कालखंडात माणसाने असे विविध मानसिक आधार वा श्रद्धास्थाने शोधून काढलीं. प्राचीन काळीं देव, धर्म हाच त्याचा मुख्य आधार होता. मध्ययुगांत थोड्याफार प्रमाणांत राजे आधारवड बनले. आजच्या विज्ञाननिष्ठ युगात देव, धर्म या कल्पना नष्ट झाल्या. मध्ययुगानंतर राजेशाहींना स्थान उरले नाहीं. आज सामान्य व्यक्तींचा मानसिक आधार नाहींसा होऊन त्याच्या मनांत पोकळी निर्माण झाली. आपण कोणाशीं तरी निगडित आहोत ही जाणीव माणसाना समाधान आणि स्वस्थता देत असते. नाहींतर फांदीला लोंबकळत असलेल्या माणसाची फांदी तुटून ती व्यक्ती निराधार व्हावी तशी माणसाची अवस्था होते. आजच्या युगात अशी पोकळी माणसाच्या मनात निर्माण होऊ लागली. या काळात हिटलर आणि मुसोलिनी यांनीं लोकाच्या या मानसिक दुबळेपणाचा फायदा घेतला. लोकांना असे आश्रयस्थान हवेंच होतें. त्यांनीं लागलीच या व्यक्ति देवस्थानीं बसविल्या आणि त्याची मानसपूजा सुरू केली. Sense of belonging—आपण कोणाला तरी बांधलें आहोत हें माणसाला आश्वासन पाहिजे असते. त्याला स्वातंत्र्याचे भय वाटते. आपण या जगांत मुक्त आहोत ही कल्पना असह्य होते. या स्वातंत्र्याच्या भीतींतून या काळातील वरील हुकूमशाही राज्याचा जन्म झाला. फ्रोमची ही मानसशास्त्रीय मीमांसा व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने अत्यंत मोलाची मानावी लागेल.

## कोसळणारी भांडवलशाही अर्थव्यवस्था

मानसशास्त्राप्रमाणे साम्यवाद्यांनीं या राज्यांचे अर्थशास्त्रीय विवेचन

केले आहे. त्यांच्या मते मरू घातलेली भाडवलशाही म्हणजे फासिझम्, नाझीझम् होय. देशातील भाडवलदाराना आपले भांडवल गुतवून त्यावर अपार पैसा मिळवावयाला जागा राहिलेली नसते. साम्राज्यवाद किंवा वसाहत-वाद देखील त्याच्या भांडवलाला फारसे क्षेत्र मोकळे करून देत नाहीत. अशा वेळीं भाडवलदाराची मरणापूर्वीची जगण्याची शेवटची धडपड सुरू होते. देशातच ते राज्यावर दडपण आणून युद्धसामुग्री तयार करण्याचे कारखाने काढू लागतात. रणगाडे, बॉम्ब इत्यादि युद्धसाहित्य तयार करून आपली भाडवलशाही टिकविणे हाच कारखानदाराचा मुख्य उद्देश असतो. परतु ही युद्धाचीं साधनें तयार झालीं म्हणजे ती समुद्रात फेंकून देणे शक्य नसते. त्यासाठीं राष्ट्रवादी भावनाना आवाहन करून युद्धाचे वातावरण ( War Hysteria ) तयार करणे जरूर असतें. त्याप्रमाणे क्षात्रतेज जागृत करून भूगोल-युद्धे सुरू करण्यात येतात. फासिझम्, नासिझम् याचे हे अगभूत लक्षण फार महत्त्वाचे आहे. साम्यवाद्याच्या दृष्टीने या वादाचा जन्म मुख्यतः मृतप्राय भाडवलशाही अर्थव्यवस्थेत आहे. भडक भाषेत सांगावयाचे म्हणजे फासिझम् हा मरू घातलेल्या भाडवलशाहीचा मरणापूर्वींचा आचका आहे. याच भाडवलशाही अर्थव्यवस्थेचे प्रत्यतर जर्मनी, इटलीमधील हुकूमशाही राजवटींत आपणास आढळून येते.

## राष्ट्राचे सामर्थ्य

वरील दोन्ही कारणांप्रमाणे जर्मनी आणि इटली या देशांतील भौतिक परिस्थितीदेखील या वादाच्या उत्क्रांतीला पोषक ठरली आहे पहिल्या महायुद्धानंतर वरील दोन्ही देश अत्यत खिळखिळे झाले होते. पुन्हा त्यांच्यांत जीव ओतून जर इतरांच्या बरोबर समान भूमिकेने जगावयाचे असले तर त्यांना पुन्हां आपली ताकद वाढविणे जरूर होते. यासाठींच सत्ता-केंद्रीकरणाची आवश्यकता होती या गरजेतूनच तेथे हुकूमशाही निर्माण झाली. कार्यक्षमता आणि हुकूमशाही याचे सबध अत्यत निकटचे आहेत हें सागण्याची देखील गरज नाहीं.

'स्वातंत्र्याचे भय,' कोसळत असलेली भांडवलशाही अर्थव्यवस्था व

वरील देशाची विपन्नावस्था यांतून वरील वादांचा जन्म आपल्या काळांत झाला. त्यांच्या उदयाची चर्चा केल्यानतर त्यांचा आणि व्यक्तिस्वातंत्र्याचा सबध काय आहे याचे विवेचन करण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. वरील वाद म्हणजे व्यक्तिस्वातन्त्र्याचा सपूर्ण अस्त हें समीकरण सूर्यप्रकाशाइतके स्वच्छ आहे. त्याचा अधिक प्रपच करणे म्हणजे पुनरुक्तीचा दोष पदरी घेण होय.

### साम्यवादी विचारशाखा

समूहवाद्यामध्ये आदर्शवाद्याचा जसा अतर्भाव होतो त्याचप्रमाणे साम्यवाद्यांचाही समावेश होतो इ. स. १८४८ मध्ये मार्क्स आणि एगल्स यानीं आपला 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो' प्रसिद्ध केला. तोच साम्यवादाचा प्रारभ मानावयाला हरकत नाहीं. मार्क्सच्या पूर्वी साम्यवादी विचार आपल्या ग्रंथातून विखुरणारे काहीं विचारवत होऊन गेले होते. प्लेटो, थॉमस मूर, मॅबले, मोर्ले, सायमन, फोरिअर, ओवेन इत्यादींच्या लिखाणांतून साम्यवादाचा पुरस्कार प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष केला गेला होता. परतु मार्क्स आणि त्याच्या आधीचे इतर सर्व साम्यवादी याच्यांत मुख्यतः तीन बाबतींत मूलभूत फरक होते :

(१) मार्क्सचा साम्यवाद हे जीवनाचे सर्वांगीण तत्त्वज्ञान होतें. मार्क्सपूर्वीचे साम्यवादी एवढ्या व्यापक अर्थाने जीवनाचे सर्वांगीण भाष्यकार नव्हते.

(२) मार्क्स हा केवळ तत्त्वचिंतक नव्हता, या साऱ्या जगाची घडी बदलून टाकू इच्छिणारा एक महान् तत्ववेत्ता होता. ( Philosophers have interpreted the world, our task is to change it ) इतर साम्यवाद्यांना ही विशाल क्रियाशीलता अभिप्रेत नव्हती.

(३) मार्क्सच्या साम्यवादाला शास्त्रीय विचाराचे अधिष्ठान होतें. इतर साम्यवादी स्वप्नाळू किंवा भूतदयावादाने प्रेरित झालेले होते मार्क्सचा हा साम्यवाद इतराहून मूलतः भिन्न होता.

मार्क्सचा साम्यवाद हें संपूर्ण जीवनाचे भाष्य असल्यामुळें त्यांत सर्वंच शास्त्राचा विचार केला आहे. त्यांत त्याने इतिहासाचे भौतिक तत्त्वज्ञान, भांडवलशाहींतील अंतर्विरोध, अतिरिक्त मूल्याचा सिद्धान्त इत्यादि विषयांचें मूलगामी विवेचन केले आहे. परतु येथे आपणांस फक्त त्याच्या राज्यविषयक कल्पनाचा अभ्यास करावयाचा आहे. व्यक्ति आणि राज्य किंवा समष्टि यांचे सबध कसे असावेत याचे विवरण करतांनां आपणास मुख्यत. तीन कल्पनाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे.

(१) अ—उत्पादनाच्या साधनांचे राष्ट्रीयीकरण,

ब—उत्पादन मुख्यतः उपयोगासाठीं—नफ्यासाठीं नव्हे

(२) अ—कामगार क्राति,

ब—कामगाराची हुकुमशाही,

क—शासनमुक्त साम्यवादी समाज ( Stateless Socialist Society )

(३) साध्यसाधन सबध.

वरील तिन्ही कल्पनातच मार्क्सप्रणीत साम्यवादाने समष्टिवादाचा पुरस्कार केला आहे.

मानवी इतिहास हा मुख्यतः वर्गयुद्धाचा इतिहास असून त्यांत भाडवलदार वर्ग नेहमींच कामगारवर्गाचे अर्थशोषण करीत आला आहे. भांडवलदार वर्ग सर्व श्रमिकाची आर्थिक पिळवणूक करतो. कारण सर्व समाजव्यवस्था खाजगी मालकी हक्काच्या कल्पनेवर उभारली आहे. उत्पादनाचीं साधनें प्रामुख्याने कांही धनपतींकडे असून त्या जोरावरच ते सर्व समाजाला आर्थिक दास्यांत ठेवू शकतात. यासाठीं समाजांतील उत्पादन-साधनें हीं खाजगी व्यक्तींकडून समाजाकडे वा राज्याकडे गेलीं पाहिजेत. यामुळे खाजगी पुजीपतींच्या हातातील शस्त्र काढून घेतल्यासारखे होणार आहे.

दुसरें, उद्योग धंद्याचे आणि शेतीचें राष्ट्रीयीकरण झाल्यानतर उत्पादनाची मूळ प्रेरणा किंवा हेतु बदलला पाहिजे. भांडवलशाही व्यवस्थेत उद्योगपति

उत्पादन करतात, तें मुख्यतः नफ्यासाठीं, समाजस्वास्थ्य किंवा मालाचा उप योग हे त्याचे गौण उपयोग होत. या नफ्याच्या प्रेरणेमुळेच अर्थव्यवस्थेत आर्थिक मंदी किंवा चलनवाढ यांचे चक्र सुरू होते. ( Trade cycle ) सामान्य माणसाचे आर्थिक स्थैर्य त्यामुळे सदैव संकटांत असतें.

भांडवलशाही उत्पादनामागची ही नफ्याची प्रेरणा काढून तेथे उत्पादनाच्या उपयोगाला जर प्राधान्य दिलें तर समाजाचा अर्थव्यवहार सुरळीत आणि सुरक्षित चालेल. प्रत्येक नागरिकाला आर्थिक स्थैर्याचे आश्वासन लाभेल.

मार्क्सनें भांडवलशाही अर्थरचना मोडून त्या जागीं ही साम्यवादी अर्थव्यवस्था सुचविली, कारण भांडवलशाहीमधील समाजव्यवस्थेत कांहीं मूठभर कारखानदाराना आर्थिक स्वातंत्र्य असते परंतु लाखो श्रमिकाना त्यांची आर्थिक गुलामगिरी पत्करावी लागते आणि आर्थिक गुलामगिरी सामाजिक, सांस्कृतिक व राजकीय गुलामगिऱ्याचा पाया आहे. त्यामुळे भांडवलशाही समाजरचनेंत नागरिकाना इतर सर्व स्वातंत्र्ये असलीं तरी तीं सर्व बेगडी असतात. आर्थिक स्वातंत्र्यावाचून इतर सर्व नागरिक स्वातंत्र्यें अर्थशून्य वा भासमय असतात.

## साम्यवादाचें राजकीय स्वरूप

मार्क्सने या आर्थिक कार्यक्रमाबरोबर राज्यसंस्थेत महत्त्वाचे बदल सुचविले आहेत. तो म्हणतो, गिरणी मालक, कारखानदार हे सर्व कामगारांचे आर्थिक शोषण करतात. याला कारण त्यांच्या हातात राज्ययंत्र असते. राज्ययंत्र, कायदा, न्यायपद्धति हीं सर्व भांडवलदाराच्या हातातील शस्त्रें आहेत. तीं त्यांनींच आपल्या स्वार्थासाठीं निर्माण केलीं आहेत. कामगारांनीं क्रांति करून प्रथम राज्ययंत्राचा ताबा आपल्या हातात घ्यावा.

राज्यसंस्थेवर कामगारवर्गाची मालकी झाल्यानंतर त्यांनीं सर्वत्र कामगारांची हुकूमशाही प्रस्थापित करावी. ही कल्पना विशद करतांना मार्क्स म्हणतो, आपल्या राजकीय सत्तेच्या जोरावर कामगार वर्ग हळूंहळूं धनिक वर्गाकडून सर्व भांडवल काढून घेईल व शेवटीं राज्याच्या हातांत उत्पादनाचीं

सर्व साधनें केंद्रित करील, " कामगारांची सर्वंकष सत्ता अर्थक्षेत्राप्रमाणें जीवनाच्या सर्व अंगोपांगावर अधिराज्य करील. हा समाज एकवर्गीय असल्यामुळे कामगाराची हुकूमशाही हीच जनतेची लोकशाही असते.

शेवटीं, कामगारक्रांतीमधून कामगारांची सर्वाधिकारशाही स्थापन झाली म्हणजे मग राज्ययंत्र नष्ट करून टाकावयाला हरकत नाहीं. कारण राज्य हे प्रामुख्यानें शोषणाचे साधन आहे. राज्य नष्ट झाल्यानतर जो स्वयंशासित ( Stateless ) साम्यवादी समाज निर्माण होईल तो सुखी आणि वैभवसपन्न असेल. तेथें त्याला जीवनातील सर्व स्वातन्त्र्यें भोगावयाला मिळतील.

## साम्यवादाचें नैतिक अधिष्ठान

मार्क्सच्या आर्थिक आणि राजकीय विचाराबरोबर आपणास नीतिकल्पनाचा येथे विचार केला पाहिजे कारण त्यानें उत्पादनाच्या साधनांचे राष्ट्रीयीकरण, कामगारांची सर्वाधिकारशाही इत्यादि कार्यक्रम सुचविले परंतु या कल्पना मूर्तस्वरूपांत कशा आणावयाच्या ? याबाबत तो म्हणतो," हीं साध्यें हस्तगत करण्यासाठीं वाटेल तीं साधने वापरावीत. End justifies the means, साधनाचीं शुचिता बाळगण्याचे कारण नाहीं. साधने चांगलीं कीं वाईट याचा फारसा बाऊ करू नये. आपले ध्येय प्राप्त करण्यासाठीं अत्याचारी मार्ग अवलंबा, कपटनीति आचरा, किंवा इतर कोणत्याही वाममार्गांचा आश्रय घ्या. साध्य मिळविणे ही मुख्य गोष्ट ! साधने कोणती हा मुद्दा गौण आहे.

वरील कार्यक्रमात मार्क्सनें राज्य आणि व्यक्ति याचे सबध कसे असावेत हें सूचित केले आहे आणि साम्यवादी समाजाचे ध्येय कसे साकार करावयाचें याबद्दलही त्याने कांहीं व्यवहारी मार्ग सुचविले आहेत.

## साम्यवादांत व्यक्तिस्वातंत्र्य कां तगू शकत नाहीं ?

त्याच्या वरील साम्यवादी तत्त्वज्ञानाचा अभ्यास करूनच कांहीं विद्वानांचें

असे मत बनलें आहे कीं, त्याच्या या साम्यवादी जगांत व्यक्तिस्वातंत्र्य टिकूं शकणार नाहीं. त्याची मीमांसा खालीलप्रमाणे करतां येईल :

(१) मार्क्सच्या आर्थिक कार्यक्रमाप्रमाणें शेती आणि कारखाने यांचें राष्ट्रीयीकरण होते. राज्याच्या हातात तेथील सर्व सत्ता केंद्रित होते. म्हणजे प्रथम त्या राज्यांत अमर्याद सत्तेचे निरंकुश केंद्रीकरण होतें आणि दुसरें, म्हणजे ही अनियंत्रित सत्ता कामगार पक्षाच्या हातात जाते.

मार्क्सच्या वरील दोन्ही कल्पनामध्ये व्यक्तिस्वातंत्र्याची सर्व दुःखान्तिका लिहिली आहे. कारण राज्याच्या हातांत आर्थिक, राजकीय, सामाजिक सत्तेचे केंद्रीकरण होते. कोणत्याही प्रकारच्या सत्तेचे केंद्रीकरण हें व्यक्ति-स्वातंत्र्याशीं सुसंगत होऊ शकत नाहीं. सत्ताकेंद्रीकरण आणि व्यक्तिस्वातंत्र्य यांची नातीं नेहमींच अहिनकुलाची असतात. त्यांतून राज्याच्या हातांत उत्पादनाचीं साधनें राहतात हा धोका तर मोठा आहे. कारण आर्थिक ताबा हा प्रत्यक्षांत सर्व मानवी जीवनावरील ताबा असतो. (The control of the means of production is the control of human life). अशा अमर्याद सत्तेचें केंद्रीकरण करून मार्क्सने प्रथम व्यक्ति स्वातंत्र्याला फार मोठा धोका निर्माण केला आहे.

( २ ) दुसरे म्हणजे हे अनियंत्रित सत्तेचे केंद्रीकरण कोठे होतें ? तर राज्याच्या हातांत. परंतु राज्य ही कल्पना अव्यक्त, अमूर्त असते. प्रत्यक्षांत राज्य म्हणजे सरकार किंवा काहीं चार-दोन व्यक्तींचें मंडळच असतें. राज्य ही अदृश्य कल्पना प्रत्यक्षात कारभार करू शकत नाहीं. म्हणजे राज्याच्या हातातील निरंकुश सत्ता ही व्यवहारात चार दोन व्यक्तींची अनियंत्रित व अमर्याद सत्ता ठरते आणि या व्यक्ति 'अतिमानवी' नसतात त्या चुकीस पात्र असतात. इतकेच नव्हे, तर अमाप सत्ता हातीं आल्यानंतर सत्तेच्या मदाने त्या धुंद होण्याचा संभव जास्त आहे. माणसांमधील सत्तालालसा व्यवहारात वाटेल तीं घाणेरडीं रूपें घेत असते. अशा वेळीं अनियंत्रित सत्तेमुळे थोड्या व्यक्तींचा अधःपात होणे स्वाभा-

विक आहे. लॉर्ड ॲक्टन यांनीं म्हटल्याप्रमाणें सत्तेमुळें माणूस अधोगतीला जाऊं लागतो आणि अमर्यादा सत्तेमुळें तर याचा संपूर्ण अधःपात होतो. हीं थोडी माणसें सत्तेचा दुरुपयोग करूं लागलीं तर मग लाखोंचें व्यक्ति-स्वातंत्र्य नष्ट होण्याचा संभव अधिक आहे. साम्यवाद्याच्या जगांत अशा वेळीं आर्थिक लोकशाही नादत असेल. परंतु तेथें राजकीय व सामाजिक लोकशाही नाममात्र राहील. तेथें प्रत्यक्षात थोड्या व्यक्तींची हुकूमशाही नादेल.

( ३ ) आणि शिवाय हें राज्य अंमलांत आणण्यासाठीं मार्क्सनें वाटेल त्या साधनाचा उपयोग करावयाला सागितला आहे. येथें तिसरा धोका निर्माण झाला कारण साध्य आणि साधन यांच्यात संवादित्व असले तर साध्य हस्तगत होण्याची शक्यता असते. साध्य आणि साधने यांच्यात जर सुसवाद नसेल तर आपलें साध्य धूम्रवलयाप्रमाणे हवेत विलीनच होऊन जाते. शासनमुक्त समाजरचना निर्माण करावयाची असेल तर त्यानुसार साधने वापरलीं पाहिजेत. राज्यसंस्था नष्ट करण्यासाठीं ती अमर्यादा रीत्या सामर्थ्यसपन्न बनविणे हा मार्ग योग्य होणार नाहीं. त्याचप्रमाणे आपण आपले साध्य कुमार्गाने प्राप्त केले तर तें किती काळ टिकेल याची शंका आहे. कारण आपण जर निंद्य साधनांनीं वा रक्तरंजित शस्त्रानीं आपलें साध्य हस्तगत केले, तर आपल्या प्रतिपक्षाला आपले साध्य त्याहूनही निंद्य मार्गांनीं हिरावून घेण्याचा अधिकार आहे. अशावेळीं वाम मार्गाचा आसरा केला म्हणून दुसऱ्या पक्षाला बोल लावता येणार नाहीं. म्हणजे साध्य आणि साधन यांच्यांत संवादित्व नसेल तर साध्य प्राप्त होईलच असें ठामपणे सागतां येत नाहीं आणि तें यदाकदाचित् मिळालें तर फार काळ टिकेल याची हमी देतां येणार नाहीं.

अमर्याद सत्तेचें केंद्रीकरण, राज्याकडे सोंपविलेली निरंकुश सत्ता आणि साध्यासाठीं वाटेल त्या साधनांचा वापर या तीन तत्त्वांवर उभारलेल्या साम्यवादी समाजांत व्यक्तिस्वातंत्र्य टिकू शकत नाहीं. अशा राज्यांत व्यक्ति-स्वातंत्र्य हें अर्धांगवायू झाल्याप्रमाणें निश्चेष्ट पडून रहातें.

## साम्यवाद आणि साम्यवादी प्रयोग यांत गल्लत नको

वरील विवेचनात रशिया, चीन किंवा युगोस्लाव्हिया या साम्यवादी राज्यांचा उल्लेख कटाक्षानं टाळला आहे. कारण मार्क्सची मूलभूत तत्त्वें आणि त्यांचा वरील देशांत झालेला प्रयोग यामध्यें अंतर असण्याचा संभव आहे. अशा चर्चेच्या वेळीं मूळ तत्त्वे आणि त्यांचे व्यवहारांतील स्वरूप यामध्यें फरक केलेलाच चांगला. कारण व्यवहार मूळ तत्त्वाशीं सदैव प्रामाणिक असेलच असे छातिवर हात ठेवून कोणालाही सांगतां येणार नाहीं. विशेषत: सर्वच माहिती रशियामधून आपल्याकडे आलेली आहे व ती संपूर्णपणें विश्वासनीय आहे असेंही गृहीत धरता येणार नाहीं. अपुऱ्या माहितीवर आपणांस आपला निर्णय द्यावा लागेल. शिवाय एकाच साम्य-वादी विचाराचे आविष्कार रशिया, चीन व युगोस्लाव्हियात निरनिराळ्या पद्धतींनें झाले आहेत. रशियामधील साम्यवादी व्यवस्थेत व्यक्तिस्वातंत्र्य अस्तंगत झाले असून ते चीनमधील राजवटीमध्ये विकसित होत आहे असें कांहीं विचारवंत मानतात. उलट, रशिया व चीन या दोन्ही देशामध्ये मानवाचे मूलभूत हक्क धोक्यात आलेले असून टिटोच्या युगोस्ला-व्हियाच्या राज्यामध्यें मात्र त्याचे जतन होत आहे अशी कांहीं अभ्यासूंची श्रद्धा आहे. मूळ तत्त्वज्ञान आणि त्याचे प्रयोग यातील फरक, या प्रयोगा-संबधीं उपलब्ध असलेली अपुरी माहिती आणि एकाच तत्त्वज्ञानाचे निर-निराळ्या देशांत झालेले भिन्न भिन्न आविष्कार लक्षांत घेता साम्यवाद आणि साम्यवादी प्रयोग यामध्ये गल्लत करून चालणार नाहीं. संकल्प आणि सिद्धि यामध्यें आपणांस सीमारेषा काढली पाहिजे. रशियामध्ये व्यक्ति-स्वातन्त्र्य विनाशाकडे चालले आहे असें म्हटले तरी त्याची मीमांसा निर-निराळ्या अभ्यासकांनीं त्या देशांतील पूर्वपरंपरा, कांहीं व्यक्तींच्या चुका किंवा सत्ताधाऱ्यांची अधिकारलालसा यासारख्या कारणांच्या आधाराने केली आहे. उदाहरणार्थ कांही समीक्षक म्हणतात, गेल्या अनेक शतकांत रशियामध्यें लोकशाहीला पोषक अशा व्यक्तीप्रामाण्याच्या परंपरा नव्हत्या म्हणून तेथें व्यक्तिवादाचा ऱ्हास झाला. इतर कांहीं राज्यशास्त्रज्ञ सांगतात,

रशियन क्रांतीच्या सुरुवातीच्या काळांत लेनिननें सत्तेचे केंद्रीकरण केलें. क्राति यशस्वी झाल्यानतर या सत्तेचे विकेंद्रीकरण न करता ती त्यानें एकाच कद्रात गोळा केली. त्याचा अटळ परिणाम म्हणजे सध्यांची रशियन राजवट होय. कांहीं विचारवंतांच्या मताप्रमाणे रशियामधील दुःखान्तिकेला तेथील ऐतिहासिक परपरा किंवा क्रांतीच्या सधि-कालांतील लेनिनचे सदोष धोरण जबाबदार नसून स्टालिनची अमर्याद सत्ताभिलाषा आहे. स्टालिनने केवळ आपल्या सत्तालोभासाठीं तेथें आपल्या हातात अनियंत्रित, अमर्याद सत्ता केंद्रित केली. स्टालिनची सत्तालालसा मुख्यतः साम्यवादी प्रयोगाच्या दुःखद कहाणीस जबाबदार आहे.

वरील तिन्ही प्रकारच्या विचारवंतामध्ये साम्यवादासबधी मतभेद आहेत. साम्यवाद आणि साम्यवादी प्रयोग यामध्ये गल्लत केली म्हणज विद्वानांच्या या निरनिराळ्या मीमासेच्या चर्चेत उतरावे लागेल. ही सर्व चर्चा टाळण्यासाठीं हेतुपुरस्सर मी केवळ साम्यवादी तत्त्वज्ञानापुरतेच आपले विवेचन मर्यादित केले. साम्यवादी रशियात आत्मप्रामाण्य आणि बुद्धिप्रामाण्य नष्टप्राय झाले असे गृहित धरले तर त्याचे कारण वरील तीन प्रकारच्या मीमासेंत नसून ते साम्यवादी तत्त्वज्ञानाच्या गाभ्यात आहे असे मला वाटतें. जरी साम्यवादी प्रयोग इग्लडसारख्या लोकशाहीच्या माहेरघरात झाला अगर पं. नेहरूसारखा हाडाचा लोकशाही भक्त जरी या साम्यवादी राज्याचा सूत्रधार झाला तरी त्या व्यवस्थेत व्यक्तिस्वातत्र्याचा उदय आणि विकास होऊ शकणार नाही. कारण त्याचीं मूलभूत तत्त्वे व्यक्तिवादाशी विसंगत आहेत. साम्यवादी तत्त्वज्ञान हे समूहवादावर आधारलले आहे. अशा साम्यवादी जगात व्यक्तीची प्रज्ञा आणि प्रतिभा बदिस्त झाली नाहीं तरच आश्चर्य! साम्यवादी राज्यातील अमर्याद सत्तेचे केंद्रीकरण, कामगाराची हुकुमशाही आणि समूहवादी तत्त्वज्ञान हीं व्यक्तीच्या सर्जनशील शक्ति बधमुक्त करण्यास असमर्थ आहेत. उलट अशी राज्यात माणसाच्या अमर्याद सर्जनशील शक्ति अनतापर्यंत सुप्त राहतील अशी साधार भीति प्रस्तुत लेखकाला वाटते.

# २.... व्यक्तिवादाचा उदय आणि विकास

समूहवादाचा प्रारंभ आणि विकास गेल्या चोवीसशें वर्षांत कशा प्रकारें झाला हें आपण अभ्यासलें. त्यांत आपण चवथ्या शतकांतील प्लेटोच्या 'तत्त्वज्ञ राजा'पासून या शतकांतील पहिल्या महायुद्धापासून दुसऱ्या महायुद्धाच्या समाप्तिपर्यंत म्हणजे १९४५ पर्यंत प्रभावी असणाऱ्या फासिझम्, नाझिझम्चा अंतर्भाव केला. त्याचप्रमाणे आज जगाच्या निम्म्या भूभागावर अधिसत्ता भोगणाऱ्या साम्यवादाची प्रकृति तपासली. या विचारप्रवाहा-प्रमाणे व्यक्तिवादी विचार मानवी इतिहासांत विशेषतः युरोपच्या जीवनात कसे उत्क्रान्त होत गेले याचा अभ्यास उद्‌बोधक ठरेल.

समूहवादाप्रमाणें व्यक्तिवादाचा उद्गम देखील प्राचीन ग्रीसमध्ये झाला. इ. स पू. ६५० ते ४५० या कालखंडात ग्रीसमध्ये मुख्यतः विश्व-चिंतनाला फार प्राधान्य होते. ही सृष्टि कशी निर्माण झाली? तिचा व्यवहार चालतो कसा? या रहस्याभोंवतीं तेथील विचाराचा सारा व्याप पसरला होता. याला आपण विश्वचिंतनाचा काळ किंवा विश्वाधिष्ठित काल (Cosmological Period) असे म्हणू. परंतु इ स. पू. ४५० च्या सुमाराला पंडिताच्या चिंतनाचे केंद्र विश्वाकडून मानवाकडे सरकूं लागले.

**प्रॉटॅगॉरस (इ. स पू. ४८० ते ४१०)**

इ. स. पू. पाचव्या शतकाच्या मध्याला विचाराचे केंद्रस्थान विश्वाकडून मानवाकडे सरकू लागले. त्या काळाचा हा विचार प्रॉटॅगॉरसने प्रभावी वाणीनें आणि परिणामकारक शब्दाने लोकांसमोर मांडला. प्रॉटॅगॉरस या अर्थाने त्या काळाची वैचारिक गरज भागाविणारा एक पंडित होता. परंतु प्रॉटॅगॉरसने हा विचार मांडण्यापूर्वी मानवाला त्या काळात एवढें महत्त्व येण्यास कोणती कारणे घडलीं याचा अभ्यास झाला पाहिजे. या भौतिक परिस्थितीच्या पार्श्वभूमीवर आपणांला प्रॉटॅगॉरसचे विचार स्पष्टपणें समजावून घेतां येतील.

## मानवाधिष्ठित काल कां सुरूं झाला ?

विश्वचिंतनाच्या काळाला पूर्णविराम पडून मानवासंबंधींच्या विचाराला प्रारंभ होण्यास मुख्यतः पुढील तीन घटना कारणीभूत झाल्या :

( १ ) लोकशाहीच्या विजयामुळे नगरराज्याचा झालेला उदय.

( २ ) विज्ञानावरील वाढता विश्वास.

( ३ ) नागर संस्कृतीची भरभराट.

इ. स. पूर्वीच्या पाचव्या–सहाव्या शतकातील ग्रीक समाजव्यवस्थेचा डोलारा मुख्यतः दोन कल्पनावर उभारला होता :

( १ ) अमीरउमरावांची प्रबल सत्ता.

( २ ) प्रभावी धर्मसत्ता

अमीरउमरावाची महाजनसत्ता ( Aristocracy ) आणि सामान्य जनतेची लोकसत्ता याच्यामध्यें त्या काळात तुंबळ झगडा चालू होता. या दोन्ही सत्ताच्या संघर्षात पुढे पुढे लोकसत्तेचा विजय होऊन अमीरउमरावी सत्तेला हादरे बसू लागले. लोकसत्तेच्या विजयामुळे समाजात महत्त्वाचे बदल होऊ लागले. प्रत्यक्ष लोकशाहीची कल्पना याच लोकसत्तेतून जन्माला आली नगरराज्याची ( City States ) कल्पना सर्वत्र पसरूं लागली. प्रत्यक्ष लोकशाही ( Direct democracy ) आणि नगरराज्ये यामुळें सामान्य माणसाला महत्त्वाचें स्थान प्राप्त झाले. कारण सामान्य नागरिक हाच या लोकसत्तेचा पाया होता साहजिकच या लोकशाहीमधील सार्वभौम नागरिकाला मध्यवर्ति स्थान प्राप्त झाले. प्रत्येकाला वाटूं लागले कीं राज्याच्या कारभारात आपण भाग घेतला तर तेथे देखील आपण मानाच्या जागा विभूषित करू. नागरिकांच्या या विचारांतून त्याच्या वक्तृत्वकलेचा, त्याच्या पांडित्याचा व इतर जीवनक्रमाचा विचार आस्थेनें सुरू झाला. साहजिकच समाजातील विचारवंताचें लक्ष याच प्रश्नावर खिळले जाऊं लागलें. विश्वाकडून विचाराचा लंबक मानवाकडे झुकू लागला.

## विज्ञानाचा वाढता प्रभाव

महाजनसत्तेप्रमाणे तत्कालीन धर्मश्रद्धांना देखील समाजांत तडे जाऊं लागलें. नवें विज्ञान प्रगत होत होतें. विज्ञानाच्या प्रकाशांत जुन्या अंध-

श्रद्धा खोट्या ठरत होत्या. धर्मकल्पनाना धक्के बसूं लागल्याबरोबर मनुष्य पुन्हा विचार करूं लागला. त्याला पूर्वीच्या विश्वचिंतनांतील फोलपणा तीव्रतेनें जाणवूं लागला. त्याचबरोबर तो मानवाच्या विचारांत अधिक रममाण होऊं लागला.

## नागरसंस्कृति वृद्धिंगत होऊं लागली

नगरराज्यातील प्रत्यक्ष लोकशाहीमुळे आणि वाढत्या वैज्ञानिक जाणिवेमुळें नागरसस्कृति वृद्धिंगत होत गेली आणि तिच्या विकासाबरोबरच मानवाधिष्ठित काळाचा उषःकाल सुरू झाला. कारण नगरे जशी वाढू लागलीं तशी नागरसंस्कृति बलवत्तर हाऊं लागली. या वाढत्या नगर-राज्याबरोबर व्यापार नव्या जोमानें वाढूं लागला. व्यापार, दळणवळण इत्यादीसाठीं व्यापाऱ्याला जे स्वातंत्र्य हवे असते त्याची त्या समाजाला गरज भासूं लागली. यातूनच पुन्हा व्यक्तिस्वातंत्र्याच्या विचाराला बळकटी येऊं लागली. स्टेस ( Stace ) या विचारवंताने म्हटल्याप्रमाणे त्या काळाची ही गरज प्रॉटॅगॉरस किंवा सॉफिस्ट पथीयानीं आपल्या ग्रंथातून माडली.

मानवी इतिहासांतील हें वैचारिक स्थित्यंतर अत्यत महत्त्वाचे आहे. विश्व हें कोणत्या द्रव्यापासून बनलें आहे ? सृष्टीचे मूळ वायू, आप, तेज यापैकी कशात आहे ? इत्यादि प्रश्नाची चर्चा करण्यापेक्षा मानवाचें जीवन समजावून घेण्याचा प्रयत्न त्या काळांत सुरू झाला. खऱ्या अर्थानें मानवी प्रगतीचा हा उषःकाल आहे अर्थात विश्वचिंनाकडून तत्कालीन लोक मानवाच्या चिंतनाकडे वळले याचें पुष्कळसे श्रेय प्रॉटॅगॉरस या विचारवताला दिलें जाते. मानवाच्या चिंतनाला प्रारंभ करणाऱ्या या काळाला आपण मानवाधिष्ठित काल, ( Anthropological or Subjective period ) म्हणूं या ! ग्रीसमधील 'सोफिस्ट' विचारशाखेला याच काळांत सुरुवात झाली. म्हणून प्रॉटॅगॉरस हा 'सोफिस्ट' शाखेचा प्रवर्तक मानला जातो.

वरील प्रकारचें विवेचन थिली ( Thilly ) विंडलबन्ड ( Windleband ), ॲरिस्टॉफेन्स ( Aristophanes ) यांनीं आपल्या ग्रंथांतून सुगम पद्धतीनें केलें आहे.

## मनुष्य हाच सर्व मूल्यांचा मानदंड

सदैव विश्वाची उपपत्ति शोधित राहणाऱ्या विचाराची प्रतिक्रिया म्हणून सोफिस्टांचा विचारप्रवाह पुढे आला. प्रॉटॅगॉरसने आपल्या तत्कालीन पाखंडी विचारानीं पूर्वींच्या धर्मकल्पना, नीतिमूल्ये, राज्यविषयक कल्पना यांना जबरदस्त टोला मारला. पूर्वींचे पंडित कोणत्याही समस्येचा उकल करण्यासाठी काहीं तरी अद्भुत वा दैवी गृहीत कृत्याचा ( postulate ) आसरा घेत. प्रॉटॅगॉरसनें ही पद्धति आपल्या बुद्धिवादी विवेचनानें टाकाऊ ठरविली त्याने जीवनांतील सर्व मूल्यांचा विचार करताना मानवाला केंद्र-स्थानीं मानले आणि सर्व चांगल्या वाईट विचाराचा निकष म्हणजे व्यक्ति-हित होय असे सांगितलें. व्यक्तींचे जीवन सुखी करणारे ते नीतिशास्त्र, माणसाला सुरक्षितता देणारे ते राज्य आणि सर्व शास्त्रांची बैठक मनुष्य आहे हे त्याने आग्रहाने बजावलें. व्यक्ति ही मध्यवर्ति मानून साऱ्या विश्वाचा आणि विचाराचा पसारा तिच्याभोंवतीं पसरविणारा प्रॉटॅगॉरस हा मानवी इतिहासातील पहिला आणि फार मोठा विचारवंत होय. 'मनुष्य हाच सर्व मूल्याचा निकष होय' हा त्याचा विचार गेलीं अनेक शतकें अधाऱ्या रात्रीच्या एखाद्या तेजस्वी ताऱ्याप्रमाणे मानवाला मार्गदर्शन करीत आहे. राज्यासाठीं मनुष्य नाहीं तर मनुष्यासाठीं राज्य आहे हा विचार देखील प्रॉटॅगॉरसच्या विचारातून पुढें आला आहे. व्यक्तिवादाचा विचार आजच्या शतकात कितीही प्रगल्भ झालेला असला तरी प्रॉटॅगॉरसचा मूलगामी विचार-मानव हाच सर्व मूल्याचा मानदंड आहे—हा आजही आपणास अत्यंत आधु-निक आणि पुरोगामी वाटत आहे.

## सुखवाद देखील व्यक्तिवादास पोषक

सोफिस्ट विचारप्रणालीमुळें व्यक्तिवादाला जोमदारपणा आला. त्याच-प्रमाणें पुढें इसवी सनाच्या तिसऱ्या-चौथ्या शतकात उदयाला आलेल्या सुखवादी ( Hedonistic ) विचारपरंपरेनें देखील हा विचार जनमनात रुजविण्यास साहाय्य केलें आहे. प्रॉटॅगॉरसने प्रतिपादिलेल्या व्यक्तिवादाचें परिणत स्वरूप म्हणजे ही 'सुखवादी' शाखा कीं या शाखेला तिचा स्वतंत्र

प्रारंभ आणि विकास आहे याबद्दल निर्णायक मत देणे कठीण आहे. तथापि सुखवाद हा व्यक्तिवादाचा पोषक ठरला हे मानावयाला काहींच हरकत नाहीं.

सुखवादी शाखेचा जनक ॲरिस्टिपस् ( Aristippus ) मानला जातो. शरीरसुख हा जीवनातील मोक्ष आहे. हे त्याच्या विचाराचे सार! हाच विचार एडॉक्सस ( Eudoxus ) या विचारवताने सिद्धान्तरूपानें अधिक सप्रमाण मांडला; विश्वातील सर्व प्राणी सुखलालसेनें प्रेरित झालेले असतात हा सर्वसामान्य निष्कर्ष त्याने बऱ्याच सखोल चिंतनानतर सागितला. परतु वरील दोघापेक्षा इपिक्यूरसने सागितलेला सुखवाद दोन तऱ्हेने भिन्न होता :

( १ ) देहसुखापेक्षा मानसिक सुख उच्च प्रतीचे असून मानवानें त्या सुखाप्रत जाण्यासाठीं धडपड करावी. असे सुख मानवी जीवनातील श्रेष्ठ ध्येय आहे, इतकेंच नव्हे, तर तें एकमेव साध्य आहे.

( २ ) सुखम्हणजे प्रामुख्याने यातना आणि चिंता यापासून मुक्ति होय.

## सुखवादी विचारशाखेचा प्रवक्ता : इपिक्यूरस

इपिक्यूरसने सागितलेला सुखवाद इतरांपेक्षा अधिक प्रगत आणि उन्नत होता. या सुखवादांतून व्यक्तिवाद पुष्ट झाला आहे. इतकेच नव्हे, तर एकोणिसाव्या शतकातील बॅन्थॅमच्या विचाराला देखील हाच विचार स्फूर्तिप्रद ठरला आहे.

इपिक्यूरसच्या काळांतील कोणती भौतिक परिस्थिति सुखवादाला पोषक ठरली याबद्दल देखील ठामपणे बोलणें मुष्किल आहे. तथापि असे मानावयास हरकत नाहीं कीं या पडिताचा हा काळ म्हणजे अस्तगत होत असलेल्या ग्रीक सस्कृतीचा सधिकाल होता. मॅसिडोनियाचा राजा फिलिप यानें ग्रीक शहर–राज्यावर जे प्रखर हल्ले केले त्यात तें संघ-राज्य जवळ जवळ खिळ खिळे झाले होते. त्याच्या या अध:पाताची चिकित्सा सुरू झाली तेव्हां हा विनाश, स्पार्टामधील समूहवादी जीवनपद्धतीचा अटळ परिणाम आहे असें

लोकांना वाटूं लागले. त्यामुळें त्या समूहवादी जीवनाविरुद्ध जोरदार प्रतिक्रिया म्हणून हा आत्यतिक व्यक्तिवादी सुखवाद पुढें आला.

इपिक्यूरसचा सुखवाद व्यक्तीला समाजजीवनामध्यें मध्यवर्ति स्थान देतो. इतकेंच नव्हे, तर व्यक्तीच्या जीवनासाठीं समाजव्यवस्था सुसंघटित पाहिजे हें देखील तो अमान्य करतो. प्रत्येक व्यक्ति आत्मस्थानी केंद्रीभूत आहे. आणि तिने स्वतःच्या सुखाचा शोध करण्यासाठींच सर्व भगीरथ प्रयत्न करावे, आपल्या सुखवादी प्रवृत्तीमुळे समाजामध्यें सघटना प्रस्थापित होते कीं विघटना निर्माण होते याचा विचार करण्याचे त्याला कारण नाहीं. ( There is no such thing as human Society Every man is concerned to himself ) इपिक्यूरसच्या विचाराचे हें सार आहे. त्याच्या विचारातील प्रमुख प्रवृत्ति ही असली तरी त्याच्या व्यक्तिवादामध्यें त्यानें समाजव्यवस्थेकडे सपूर्णपणे दुर्लक्ष केले असे मात्र मानता येणार नाहीं. समाज संघटित राहावा असें त्यालाही वाटतें. परंतु सर्व व्यक्तींचे जीवन एकत्र गुंफणारा हा धागा केवळ परस्पर स्नेहभाव आणि शुद्ध सहकारी वृत्ति हाच असावा. स्वयस्फूर्त सहकार्य ही विकसित जीवनाची साक्ष आहे. याच एका पायावर समाजजीवन उभारलें तर ते व्यक्तीच्या सुखाशीं संवादी ठरेल असे त्याला वाटते.

इपिक्यूरसने आपल्या सुखवादात व्यक्तिवादाला गैरवाजवी महत्व दिलें असें वाटतें. आत्यंतिक व्यक्तिवाद म्हणजेच इपिक्यूरसचा सुखवादी व्यक्तिवाद होय. त्यानें व्यक्तिजीवनाला जे प्राधान्य दिलें ते अत्यत महत्त्वाचे आहे यात शकाच नाहीं. परतु त्याचबरोबर राज्यसस्थेला वा समाज-स्थैर्याला त्याने डावलले हें देखील दुर्लक्षून चालणार नाहीं. समष्टीला आत्यंतिक श्रेष्ठत्व द्यावयाला नको, त्याचप्रमाणें व्यक्तिवादाला प्रमाणाबाहेर महत्त्व द्यावयाला नको. संगीतामधील विविध वाद्यांप्रमाणे व्यक्ति आणि समाज यांच्यामध्यें मधुर संवादी नातीं निर्माण झालीं पाहिजेत. इपिक्यूरसचा व्यक्तिवाद या साध्याची हमी देऊ शकणार नाहीं. कारण त्याचा व्यक्तिवाद हा अराज्यवादाच्या सीमारेषेवर रेगाळत असल्यासारखें वाटते. विस्कळित समाजव्यवस्थेमध्यें व्यक्तिवाद देखील फार काळ तग धरूं शकणार नाहीं. व्यक्ति

आणि समाज यांचा समन्वय कसा साधावा हा मूलगामी प्रश्न आहे. इपिक्यूरसने याला योग्य उत्तर दिलेले नाहीं.

## अथेन्सचा लोकप्रिय लोकशाही पक्षनेता पेरिक्लीस
( इ. स. पू. ४९० ते इ स. पू. ४२९ )

इपिक्यूरसनंतर अथेन्स शहरात लोकशाहीला एक फार मोठा पाठीराखा मिळाला आणि तो म्हणजे पेरिक्लीस होय. वास्तविक पेरिक्लीस हा राज्यशास्त्रज्ञापेक्षा राजकारणी होता, तत्त्ववेत्त्यापेक्षा तो मुत्सद्दी अधिक होता. त्यामुळे त्यांचा अतर्भाव निरनिराळ्या राज्यशास्त्रज्ञाच्या मालिकेत कितपत करता येईल याबद्दल मतभेद होणे स्वाभाविक आहे. परतु असें असून देखील पेरिक्लीसचे ग्रीसमधील लोकशाहीवरील ऋण आपणांस अमान्य करून चालणार नाहीं. लोकशाहीला पोषक अशा काहीं परपरा त्याने निर्माण केल्या. त्याने या राज्यपद्धतीवरील सामान्य लोकाचा विश्वास दृढतर केला आणि शिवाय आपल्या भाषणामधून त्याने काहीं महत्त्वाचे विचार माडून ठेवलेले आहेत. विशेषतः स्मशानभूमीवर सैनिकासमोर त्यानें केलेले महत्त्वपूर्ण भाषण हे राजशास्त्राच्या विचारधनांत खास भर टाकणारे मानले पाहिजे. हे भाषण विवेचनाच्या ओघात पुढे येईलच.

### पेरिक्लीसचा वैचारिक पिंड कसा घडला ?

पेरिक्लीस हा प्रभावी, भेदक वक्ता होता. त्या काळांतील ग्रीकांचा शिक्षणक्रम पुरा करून त्याने संगीत, काव्य, अलकारशास्त्र, तत्त्वज्ञान, व्यायामशास्त्र आत्मसात् केले होते अथेन्समध्ये लोकशाही सुस्थिर पायावर उभी करणाऱ्यांपैकीं पेरिक्लीस हा प्रमुख गणला जाईल. त्याचा वैचारिक पिंड घडविण्यास मुख्यतः पुढील व्यक्ति कारणीभूत झाल्या.

पेरिक्लीसचे वडील पर्शियाशीं झालेल्या लढायात कामाला आले होते. आईकडून तो क्लेस्थेनीस घराण्यांतील होता. क्लेस्थेनीस हा अथेन्समधील लोकशाहीचा एक नाणावलेला शिल्पकार होता. आई आणि वडील या दोन्ही घराण्यांकडून पेरिक्लीसला लोकशाही प्रेमाचें बाळकडू मिळालें होतें.

पेरिक्लीसचे आचार्य अॅनॅक्झेगोरस हे होते. अॅनॅक्झेगोरस हे तत्त्वज्ञानी आणि विज्ञानांत प्रगत झालेले तत्कालीन मोठे पंडित होते. त्यांच्या अज्ञेयवादी तत्त्वानुसार ते म्हणत, या जगाचा कारभार भाडखोर व क्षुद्र वृत्तीचे देव चालवीत नाहींत, होमरच्या महाकाव्यातील देवताही चालवीत नाहींत, तर परमश्रेष्ठ अशी चिन्मयता जगाचा कारभार चालवीत आहे. या आचार्यांच्या शिकवणुकीचा परिणाम पेरिक्लीसच्या वैचारिक जीवनावर फार मोठा झाला होता. या अज्ञेयवादाशिवाय विज्ञानांतील अनेक महत्त्वाच्या प्रश्नावर पेरिक्लीसला त्याच्या गुरूकडून महत्त्वाचे ज्ञान मिळाले होतें. त्याचा त्याला लोकशाहीच्या कारभारांत मोठा उपयोग झाला.

अॅनॅक्झेगोरसप्रमाणेच झेनो हा पेरिक्लीसचा एक प्रमुख आचार्य होता. संभाषणचातुर्य, वादपटुत्व, तर्कशुद्ध विवेचन याचे शिक्षण पेरिक्लीसला याच गुरूच्या आश्रमात मिळाले झेनो हा प्रसिद्ध तत्त्ववेत्ता तर होताच, परंतु त्याचें वक्तृत्व अत्यत परिणामकारक होतें. मुत्सद्देगिरीला लागणारे पुष्कळसे गुण त्याने झेनोच्या आश्रमांतून घेतले. याशिवाय जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोण, निसर्गसिद्धान्त व मानव यांचे परस्पर संबध, सामाजिक नीति, व्यक्तिस्वातत्र्य इत्यादि प्रश्नावर त्याला झेनोकडून महत्वाचें ज्ञान मिळूं शकले.

अशा तऱ्हेने वैचारिक पिंड तयार झालेला पेरिक्लीस अथेन्सच्या लोकशाहींत पक्षनेता म्हणून लवकर चमकला.

### ज्यूरी पद्धतीचा जनक

अथेन्समधील लोकशाही सुस्थिर करण्याच्या दृष्टीनें त्यानें दोन महत्त्वाच्या परंपरा निर्माण केल्या एक तर तत्कालीन ज्यूरी-पद्धति ही प्रथम त्यानेंच सुरू केली होती असें कांहीं राज्यशास्त्रज्ञांचें मत आहे पूर्वी वरिष्ठ वर्गातील न्यायाधिशांचें अॅरिओपागस नांवाचें न्यायमदिर होते. पेरिक्लीसने या वरिष्ठ वर्गाची ही न्यायदानाची महत्त्वाची सत्ता काढून घेऊन ती लोकनियुक्त ज्यूरीकडे सुपूर्त केली. त्याने स्थापन केलेलें हे लोकनियुक्त न्यायमदिर दिकास्टेरीस या नावानें प्रसिद्ध होते. ही लोकशाहीप्रधान न्यायदानपद्धति पेरिक्लीसनें सुरू केली कीं दुसऱ्याच एखाद्या मुत्सद्यानें अमलांत आणली याबद्दल

मतभेद आहेत. तथापि ही पद्धति पेरिक्लीसनें सुरू केली असावी याला पुष्कळ पुरावे आहेत. लोकशाहीच्या विकासांतील हा टप्पा आज गौण असला तरी त्या काळांत महत्त्वपूर्ण गणला पाहिजे.

शिवाय न्यायदानासाठीं जे ज्यूरर्स नेमले जात त्यांना सरकारी तिजोरींतून पगार मिळावा असा कायदा त्यानें केला. विनामूल्य ज्यूरर्स म्हणून काम करण्यामध्ये सामान्य लोकाना आर्थिक झळ सोसावी लागे. पेरिक्लीसनें ही पद्धति सुरू केल्यामुळे न्यायदानपद्धतीला लोकशाहीचें व्यापक अधिष्ठान लाभलें आणि सामान्य माणसाचे सार्वभौमत्व मान्य केलें जाऊं लागलें.

## सैनिकांसमोरील महत्त्वपूर्ण भाषण

वरील ज्यूरीपद्धतिप्रमाणें त्यानें अथेन्स-स्पार्टा युद्धाच्या वेळीं सैनिकांसमोर केलेले भाषण राज्यशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. अथेन्स-स्पार्टा युद्धाच्या पहिल्या वर्षात जे अनेक सैनिक धारातीर्थी मरण पावले होते, त्यांच्या सन्मानार्थ त्याने स्मशानभूमीवर हे भाषण केले होतें. लोकशाही कारभाराच्या दृष्टीनें त्याचें हें भाषण अविस्मरणीय आहे. त्यांत तो म्हणतो,

" अथेन्समधील नागरिक राज्याकडे दुर्लक्ष करीत नसतो. कारण तो आपल्या घरादाराची सदैव काळजी वाहत असतो. राज्याच्या व्यवहारांत जो इसम भाग घेत नाहीं तो आमच्या दृष्टीनें कुचकामाचा आहे.

"आमचे सार्वजनिक जीवन सांचेबद्द नाहीं. मूठभर मक्तेदारांच्या हातांत आमच्या नाड्या सापडलेल्या नाहींत. आमच्या जीवनांत सर्वांना खुला वाव आहे. आमच्यामध्ये कोणीही कोणाकडे संशयग्रस्त नजरेनें पहात नाहीं, मतभेद झाला म्हणून संतापत तर नाहींच पण कुणी विरोधकाशीं असहिष्णु वृत्तीनें देखील वागत नाहीं. आमच्यामध्यें सर्वत्र परस्पराबद्दल आदरभाव वसत आहे. कायदा आणि न्याय यांच्याबद्दल आम्हांस गाढ आदर आहे. या आदराच्या भावनेनेंच आम्ही दुष्कृत्यापासून चार पावलें दूर राहतों." (History of Political Thought by Sabine P. P.28-29)

परमत-सहिष्णुता, कायदा, न्याय यांच्यावरील विश्वास हे लोकशाहीचे

अंगभूत भाग होत. पेरिक्लीसनें आपल्या भाषणांतून या मूल्यांवर भर दिल्यामुळे अथेन्समधील लोकशाही बळकट होण्यास निश्चित मदत झाली.

आजच्या विधिमंडळाधीन लोकशाहीच्या काळांत देखील त्याचे हे विचार उपयुक्त आहेत परंतु अर्थात् आजच्या गुंतागुंतीच्या राज्यापुढील आणि व्यक्तीपुढील समस्यांना तो समाधानकारक उत्तर कसा देऊ शकणार ?

## सिसेरो ( इ. स. पू. १०६ ते इ. स. पू. ४३ )

सिसेरोने पहिल्या शतकाच्या मध्यास रिपब्लिक ( Republic ) आणि लॉज् ( Laws ) हे दोन ग्रंथ प्रकाशित केले. सिसेरोच्या विचारावर ग्रीस-मधील स्टॉइक्स, सोफिस्ट आणि हेडॉनिष्ट या तिन्ही विचारप्रणालींचा स्पष्ट परिणाम दिसून येतो. त्यामुळे कांहीं टीकाकाराचे असे प्रामाणिक मत आहे कीं सिसेरोचे राज्यग्रंथ म्हणजे त्याच्या आधींच्या समकालीन ग्रंथाचा संगतवार संग्रह आहे. त्यात त्याच्या स्वतंत्र प्रज्ञेपेक्षां संपादनकौशल्याचा प्रत्यय अधिक येतो. या वादात पडून सत्यान्वेषण करीत बसण्याची येथे आवश्यकता नाहीं. एवढे मान्य केले पाहिजे कीं, त्याच्या ग्रंथांतील दोन विचार अत्यंत महत्त्वाचे होते.

(१) विधिनियमांना मानवाच्या समतेचे आधिष्ठान पाहिजे.

(२) राज्य आणि व्यक्ति यांचे अन्योन्यसंबंध परस्पर सहकार्यावर आधारलेले आहेत.

## विधिनियमांना समतेचे अधिष्ठान

सिसेरोच्या विचारपद्धतीवर स्टॉइक्सांच्या निसर्गनियमाच्या सिद्धान्ताचा मोठा पगडा बसलेला होता. त्यांच्या मते निसर्गनिर्मित विश्वामध्यें सर्वत्र समता दिसून येते. सिसेरोनें स्टॉइक्सांच्या या तत्त्वाला व्यापक बैठक दिली आणि मानवाच्या सामाजिक जीवनाला देखील हें समतेचें तत्त्वज्ञान लागूं केलें. त्याच्या मतें जगांतील सर्व माणसांमध्ये समानता आहे. कारण प्रत्येकाला निसर्गाकडून बुद्धीचा सारखाच ठेवा मिळालेला आहे. सर्वच माणसें पिंडानें बुद्धिप्रामाण्यवादी आहेत. प्रत्येकामध्ये अमर्याद सर्जनशील शक्ति आहेत. प्रयत्न केल्यास प्रत्येकास आपल्या अंतरीच्या सुप्त शक्तींचा

मनोहर आविष्कार करतां येईल. प्रत्येकाच्या अमर्याद सुप्त शक्ति आणि जबरदस्त बुद्धिवैभव यावर सिसेरोचा विश्वास आहे त्यामुळेच तो म्हणतो, राज्याचे सर्व विधिनियम मानवाच्या समतेवर उभारले पाहिजेत. हाच विचार त्याने आपल्या ग्रंथात मांडला आहे. तो म्हणतो, "There is in fact a true law – namely right reason, which is in accordance with nature, applies to all men and is unchangeable and eternal... .. To invalidate this law by human legislation is never morally right... .. Neither the Senate nor the people can absolve us from our obligation to obey this law......It will not lay down one rule at Rome and another at Athens nor will it be one rule to-day and another to-morrow. But there will be one law, eternal and unchangeble . There will be .......... one common master and ruler of men, namely God."
( Republic III 22 Translation by Sabine and Smith ).

सर्व माणसे सारखीं आहेत ही त्याची कल्पना देवावरील श्रद्धेतून निघाली आहे. परतु त्याच्या या समतेच्या कल्पनेमुळे राज्यशास्त्रात दूरगामी परिणाम झाले आहेत. त्यांचे महत्त्व दुहेरी आहे सिसेरोच्या आधीं माणसाच्या सारखेपणावर अचल विश्वास व्यक्त करणारा कोणताही विचारवंत झाला नव्हता उलट, प्लेटो आणि ॲरिस्टॉटल यानीं तर माणसाच्या विषमतेवर आपले राजकीय विचार आधारले आहेत प्लेटोच्या 'तत्त्वज्ञ राजा'च्या कल्पनेंत प्रत्येक व्यक्तीच्या बुद्धिविकासाविषयीं त्याने शका व्यक्त केली आहेच. परतु ॲरिस्टॉटलनेदेखील त्या काळाची गुलामाची सस्था टिकावी असें म्हटले आहे. प्रत्येकामध्यें सारखीच प्रज्ञा आणि प्रातिभा आहे आणि मानवी समतेचा हा सिद्धान्त विश्वव्यापी आणि त्रिकालाबाधित आहे. हे घोषित करणारा सिसेरो हा जगाच्या इतिहासातील पहिला विचारवत आहे. त्याच्या या विचाराचा परिणाम ख्रिश्चन धर्म, ऑगस्टिन, रोमन विधिनियमपद्धति, मध्ययुगीन विचारवत, एकोणिसाव्या शतकांतील कांही राज्यशास्त्रज्ञ यांच्यावर झालेला आहे. जो कायदा व्यक्तीच्या वर्ण किंवा धर्म यांच्या भेदावर आधारला आहे तो कायदाच नव्हे हे त्या काळांत सिसेरोनें आपल्या

प्रभावी लेखणीनें मानवाला सांगितलें. त्याने मानवी स्वातंत्र्याची मोठी जोपासना केली हें त्या काळांत फार थोड्यांना उमजले.

### राज्य आणि व्यक्ति यांचे परस्पर संबंध

सिसेरोच्या वरील विधिनियम पद्धतीच्या पायाभूत मूल्याप्रमाणें त्यानें राज्य आणि व्यक्ति यांचे संबंध कसे असावेत याचे सुगम विवेचन केलें आहे.

तो म्हणतो, " राज्य हे प्रत्येक व्यक्तीचे हक्क वा सार्वभौमत्व आणि परस्पर सहकार्य यांवर आधारले आहे.राज्य म्हणजे नीतिप्रधान समाज, तो एक सामाजिक ठेवा आहे, जनतेचा व्यवहार आहे. (The affair of the people or Commonwealth) राज्यामध्ये एकमेकांच्या हक्काला मान्यता देऊन कायद्याबद्दल आदर दाखविणाऱ्या नागरिकाचा प्रामुख्यानें समावेश होतो. अशा नागरिकाचा सघ म्हणजे राज्य होय. सिसेरोची ही राज्याविषयक कल्पना आजही आपणास महत्त्वाची वाटेल. त्याच्या या राज्याच्या कल्पनेंत राज्याच्या सुस्थिरतेची हमी आहे आणि व्यक्तीच्या सार्वभौमत्त्वाचें आश्वासन आहे. त्याची कल्पना प्रत्यक्षांत कशी आणावयाची याबद्दलचे त्याचे विवेचन मात्र बरेंच त्रोटक आणि संदिग्ध वाटते. व्यक्ति-स्वातंत्र्याच्या इतिहासात सिसेरोचे वरील दोन्ही विचार मोलाचे आहेत. परंतु त्यात त्याच्या पहिल्या विचाराचे श्रेष्ठत्व विशेष मोठे आहे. कायदा योग्य कीं अयोग्य हें ठरविण्याचा त्याचा मानदड मानवी समानता हा होता. तो आजच नव्हे तर अनंत शतकें कायम स्वरूपाचा मानला जाईल.

### नवजीवनाची चळवळ

सिसेरोनें विधिनियमाना समतेची व्यापक बैठक दिली आणि व्यक्तिवाद पुष्ट केला. परतु त्याच्यानंतर पहिल्याशतकापासून तो बाराव्या शतकापर्यंत युरोपचें वैचारिक जीवन जवळजवळ गतिशून्य ( Static ) बनलें होते. खिश्चन धर्माचा उदय, विस्तार आणि त्याचें युरोपच्या जीवनावरील अमर्याद प्रभुत्व यामध्येंच हीं बारा शतके गेलीं. परंतु त्या-

नंतर मात्र तेथें धर्मसुधारणेची चळवळ आणि नवजीवनाची चळवळ सुरू झाली. अनेक शतकें थंड गोळ्यासारख्या पडलेल्या युरोपच्या जीवनांत येथूनच कांहीं ऊब निर्माण होऊं लागली.

शेंकडों वर्षें युरोपियन समाजावर निरंकुश सत्ता गाजविणाऱ्या रोमन पोपच्या आसनाला जबरदस्त हादरा कोणी दिला असेल तर तो सोळाव्या शतकांतील बंडखोर मार्टिन ल्यूथरनेंच होय! परंतु त्याच्या पूर्वी डांटे, मार्सिलिओ व चर्चच्या पुनर्घटनेच्या चळवळींचे नेते यांनीं पोपचे सिंहासन डळमळीत केलें होतें. डांटेनें राज्य आणि धर्मपीठ (चर्च) यांचे स्थान बरोबरीचे असून पोपनें राज्यकारभारांत हस्तक्षेप करूं नये असें सांगितले. तर मार्शिलियो त्याच्याही पुढें दोन पावलें गेला आणि त्याने धर्मपीठ व धर्मगुरु हे राजापेक्षां दुय्यम आहेत हे सांगितले चर्चच्या पुनर्घटनेच्या चळवळीने ( Concilliar Movement ) पोपचे अमर्याद अधिकार पुष्कळ प्रमाणांत सकुचित केलें. चर्च विरुद्ध राज्य यांच्या या झगड्यात इरॅस्मस. मूर, कॉलेट, कॉलव्हिन आदि धर्मसुधारकांचें स्थान फार मोठें आहे परतु रोमन पोपला जाणवेल असा प्रभावी प्रहार त्याच्या धर्मसत्तेवर कोणी केला असेल तर तो मात्र मार्टिन ल्यूथरनेंच होय. त्याच्या काळात धर्मपीठें व धर्मगुरु म्हणजे दभ, अनीति, दुवर्तन याचे माहेरघर बनलें होतें. तथापि त्या काळांत धर्मगुरूला विरोध करणें हे अनंत हालअपेष्टांना आमंत्रण देण्यासारखें होते. तें धैर्य ल्यूथरने दाखविलें. त्यानें धर्मगुरूचा अनाचार चव्हाट्यावर आणला आणि त्याच्या धर्मसत्तेला त्यानें आव्हान दिलें. पोप मोठा असला तरी धर्मग्रंथ त्याच्याहूनही मोठा आहे आणि तोच आम्ही प्रमाण मानणार हें त्यानें सागितलें. अशा काळांत पोपला फार मोठी रक्कम उभी करावयाची होती. त्यासाठीं त्यानें पापमुक्ततेचे परवाने ( Indulgences ) विक्रीला काढले, ल्यूथरनें पोपची ही कल्पना निंद्य आहे असें घोषित करून त्याचा जाहीर धिःकार केला. संतापाने बेहोष झालेल्या पोपने ल्यूथरवर सामाजिक बहिष्कार घातला. ल्यूथरनें त्याला उत्तर म्हणून त्याच्या पापमुक्ततेच्या परवान्यांची समारंभानें जाहीर होळी केली ! त्याच्या त्या होळीमध्यें ते परवाने जळाले असोत नसोत, त्यामध्ये पोपची धर्मसत्ता होरपळून निघाली

यांत शका नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्याच्या इतिहासांत ल्यूथरच्या या बडाला मोठे मानाचे स्थान द्यावे लागेल.

धर्मसुधारणेच्या या चळवळीप्रमाणे नवजीवनाच्या चळवळीने व्यक्तिवादाच्या प्रगतीला अमोल साहाय्य केले आहे. ही नवजीवनाची चळवळ जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात सुरू झाली होती. तथापि तिचा प्रभाव तत्त्वज्ञान, विज्ञान, काव्य इत्यादि क्षेत्रात मोठ्या ठळकपणानें प्रत्ययाला येतो.

तेराव्या शतकामध्ये प्लेटो ॲरिस्टॉटलच्या तत्त्वज्ञानाचा मध्यंतरी बंद पडलेला सूक्ष्म व्यासंग पुन्हां सुरू झाला. मात्र हा अभ्यास करताना त्या काळाच्या विचारवंतानीं प्राधान्य दिले ते मात्र स्वत.च्या बुद्धीला आणि मताला ! शब्दप्रामाण्यवादाला विराम देऊन बुद्धिप्रामाण्यवादाला त्यानीं अभ्यासाच्या क्षेत्रांत जे मानाचे स्थान दिले तेच पुढील इतिहासात अत्यत साहाय्यभूत ठरले.

तत्त्वज्ञानाच्या क्षेत्राप्रमाणे विज्ञानाच्या क्षेत्रातही व्यक्तिस्वातत्र्याचीं गीतें गाइली जाऊ लागलीं. ब्रूनो, कोपर्निकस, गॅलिलिओ केपलर, न्यूटन आदि शास्त्रज्ञानीं ज्ञानाच्या जोरावर विश्वातील नवी सत्ये हुडकून काढलीं व बायबल माहात्म्य पुष्कळ प्रमाणात कमी केले. 'पृथ्वी स्थिर असून सूर्य फिरत आहे ' या बायबलमधील 'सत्याला' ब्रूनोने मप्रमाण धक्का दिला व त्यातील अज्ञान लोकासमोर माडले. त्याच्या या पाखडी मताबद्दल पोपच्या आधळ्या अनुयायानीं त्याला दगडाखाली ठेचून मारले दुर्दैव बिचाऱ्याचे कीं ते ब्रूनोला मारू शकले, परतु त्याने सागितलेल्या सत्याला ते ठार करू शकले नाहींत ! त्याचप्रमाणे इ. स. १५२२ सालीं डॉ. बर्ट याच्या शरीरशास्त्राच्या अभ्यासाच्या प्रयत्नातही पोपने अडथळा आणून शेवटी त्याच्या धर्मबाह्य वर्तनाबद्दल त्याला जिवत जाळण्याची शिक्षा दिली होती. या आरभीच्या बुद्धिप्रामाण्यवादी विचारवतामुळे व्यक्तिस्वातंत्र्याचा इतिहास प्रगत होत होता.

तत्त्वज्ञान आणि विज्ञान याच्याप्रमाणें काव्याच्या प्रातातही रोमॅन्टिसिझम्'च्या उपासकानी स्वातंत्र्याची महती गाइली. त्या काळात सामाजिक बंधनामुळे सामान्य माणसाचा जीव गांजून गेला होता. त्यांना जीवनाची

बंधनें असह्य झालीं होतीं. ही परिस्थिति बदलण्याचें सामर्थ्य तर कवीं-जवळ नव्हतें स्वातंत्र्यसंपन्न जीवनासाठी त्याचे अंतःकरण आसुसलेले होते. अशा वेळीं आपल्या प्रतिभेच्या साहाय्याने उंच उड्डाण करून त्यांनीं स्वतंत्र मानवाचे रम्य चित्र रेखाटलें. शेली या थोर कवीने त्या काळात या कवि वर्गाचे नेतृत्व केले. त्याच्या काव्यामुळे इतरांमध्ये देखील स्वातं-त्र्याची इच्छा निर्माण झाली.

धर्मसुधारणेच्या आणि नवजीवन चळवळीच्या काळात व्यक्तिवाद चांग-लाच प्रगत झाला त्यानंतर सतराव्या-अठराव्या शतकांतील औद्योगिक क्रांतीने त्याला जोम प्राप्त झाला. १६८९ ची इंग्लंडची रक्तशून्य क्रांति १७८९ ची फ्रेंच राज्यक्रांति व इ. स. १७७६ मधील अमेरिकेचे स्वातंत्र्ययुद्ध हें युरोपमध्ये अतिशय मानाचे स्थान पटकावून बसले. यानंतर एकोणिसाव्या शतकात या विचाराचे फार मोठे पुरस्कर्ते निर्माण झाले.

जेरेमी बेन्थॅम ( इ. स. १७४८--१८३२ )

मध्ययुगामधील नवजीवनाच्या आणि धर्मसुधारणेच्या चळवळीमुळे व्यक्तिस्वातंत्र्याचा विचार बलशाली झाला होता. त्यात मुख्यतः धार्मिक, राजकीय, शास्त्रविषयक कारणाचा भाग अधिक होता. तथापि अठराव्या शत-काच्या उत्तरार्धात औद्योगिक क्रांतीला सुरवात झाली आणि वरील कारणां-बरोबर व्यापारी वर्गाच्या स्वातंत्र्याने व्यक्तिवादी चळवळ अधिक सामर्थ्य-संपन्न बनूं लागली. नव्या नव्या शोधाबरोबर उत्पादनाचीं साधनें आमूलाग्र बदलूं लागलीं मध्ययुगीन सरंजामशाही मावळतीला लागली नवा साहस-प्रिय व्यापारी कारखानदारवर्ग उदयाला आला त्याच काळात नव्या आशियाई वसाहती युरोपीय राज्यांना मिळाल्या नवे शास्त्रीय शोध व आशिया आफ्रिकेमधील वसाहती यामुळे कारखानदाराच्या कर्तृत्वाला अफाट क्षितिज मोकळे झाले. भांडवलदारांना मुक्तस्पर्धेसाठीं अनिर्बंध स्वातंत्र्य पाहिजे होतें. ॲडम स्मिथनें ते आपल्या अर्थशास्त्रीय सिद्धान्ताने व्यापारी वर्गाला दिले होते. त्याच दिशेने बॅन्थॅम आणखी चार पावलें पुढे गेला व त्याने साहसप्रिय खुल्या स्पर्धेचे आपले तत्त्वज्ञान जोमदारपणे प्रतिपादन केले.

'जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त सुख' हा त्याच्या सर्व मूल्यांच मानदंड ! याच एका पायावर त्यानें राज्य आणि व्यक्ति यांचे संबंध कसे असावेत हें प्रतिपादन केले आहे. तो म्हणतो, "मानवी जीवन दोन शक्तींनीं नियंत्रित केले आहे. सुख आणि दुःख या दोन शक्ति त्याचें जीवन घडवीत असतात. राज्याच्या विधिनियमांना व व्यक्तीच्या आयुष्याला त्याच्या सुख-दुःखाच्या गणिताचें अधिष्ठान पाहिजे.

'जास्तींत जास्त लोकांचें जास्तींत जास्त सुख' या त्याच्या तत्त्वाप्रमाणें बॅन्थॅमनें राज्याला कमीत कमी अधिकार असावेत असें सांगितलें. कारण व्यक्तींना आपलें सुखदुःख कशांत आहे हे चांगले समजत असतें राज्यानें अलिप्त राहून सर्व व्यक्तींचे व्यवहार निर्विघ्नपणे कसे चालतील एवढेच पहावें. राज्य मुख्यतः देशात शांतता व सुव्यवस्था राखणारी एक कार्यक्षम यंत्रणा असावी. राज्याने ही लक्ष्मणरेषा ओलांडून अधिक कामें हातीं घेणे म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्याचे अपहरण करणें आहे.

बॅन्थॅमचा वरील विचार त्याच्या काळात जरी प्रभावी ठरला तरी त्याच्या मृत्यूनतर लवकरच साहसप्रधान मुक्तस्पर्धेचे भयानक दोष दिसूं लागले. मूठभर धनपतींनीं साऱ्या समाजाचा आर्थिक ताबा आपल्या हातांत घेतला आणि आर्थिक नियंत्रणाने सर्व जीवनच ते नियंत्रित करूं शकले. त्याचा सुखवाद हा थोड्या भांडवलदाराचा सुखवाद ठरला व लाखो मजुरांचा व शेतकऱ्याचा छळवाद ठरला. काहीं थोड्या कारखानदारांचें आर्थिक स्वातंत्र्य हें अगणित दलितांच्या आर्थिक गुलामगिरीवर अधिष्ठित आहे हें दिसून आले.

शिवाय त्याची सुखाची कल्पना ही अत्यंत अव्यक्त व अमूर्त आहे. त्या सुखाचे वस्तुनिष्ठ मोजमाप कोणतें ? सुखाचा 'बॅरॉमिटर' जर मिळाला नाहीं, तर मग सुखवादी विचार व्यवहारात कितपत उपयोगी ठरणार ? बॅन्थॅमने मानवी सुखाचे तर गणितच तयार केले. पण सुख ही एक मानसिक अवस्था आहे. ती गणितश्रेणींत बसूं शकत नाहीं.

## जॉन स्टुअर्ट मिल ( इ. स. १८०६ ते १८७३).

व्यक्तिवादाचा शास्त्रशुद्ध पद्धतीनें अत्यंत सूक्ष्म अभ्यास करणारा एकोणिसाव्या शतकातील दुसरा मोठा विचारवंत म्हणजे जॉन स्टुअर्ट मिल हा होय. त्यानें व्यक्तिवादाचा जो व्यापक आणि खंबीर पाया घातला तो आज देखील मोठमोठ्या व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांना मार्गदर्शक ठरत आहे.

मिलचा मनःपिंड व्यक्तिवादी बनला याला मुख्यतः तीन कारणें सांगतां येतील :

( १ ) जॉन स्टुअर्ट मिलचे वडील जेम्स मिल हे बेन्थॅमचे अनुयायी असून त्यांचा व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वावर अभग विश्वास होता. त्यांच्याच विचाराचा खोल परिणाम जॉन स्टुअर्ट मिलच्या मनावर झाला.

( २ ) बॅन्थॅमनें ज्या खुल्या स्पर्धेचा पुरस्कार केला होता तो विचार वाढत्या भांडवलशाहीला आवश्यक होता. अनिर्बंध स्पर्धा हा जवळ जवळ त्या काळाचा धर्म होता. मिल त्याला अपवाद राहूं शकला नाहीं.

( ३ ) हेगेलच्या आदर्शवादामुळें सत्तेचें अमर्याद केंद्रीकरण होते. त्या निरकुंश सार्वभौम सत्तेमुळे व्यक्तिविकासाला फार मोठा अडथळा निर्माण होतो. नेपोलिअन बोनापार्ट हें आदर्शवादाचें परिणत स्वरूप होते. त्याची उलटी प्रतिक्रिया म्हणून देखील मिल कट्टर व्यक्तिवादी बनला

मिलनें व्यक्तिवादावर कोणतें निश्चित विचार मांडले हें ठामपणें सागणें कठीण आहे. कारण त्याच्या विचारात,

( १ ) इंग्लडमधील उपयुक्ततावाद.

( २ ) फ्रान्समधील समाजवाद.

( ३ ) जर्मनीमधील आदर्शवाद यांचा मिलाफ झाला आहे.

### उपयुक्ततावादाला व्यापक बैठक

बेन्थॅमच्या उपयुक्ततावादाला त्यानें व्यापक अधिष्ठान देऊन उन्नत स्वरूप प्राप्त करून दिले. बेन्थॅमनें सुखदुःखाचें गणित व्यक्तीच्या जीवनापुरतेंच मर्यादित केले होतें. मिलनें व्यक्तीच्या सुखदुःखाबरोबर समाजजीवनाचा विचार

आग्रहानें मांडला व तिच्या नीतिमूल्याना समाजाभिमुख बनविले. त्याच्या या विचाराप्रमाणें त्याने राज्य आणि व्यक्ति यांचे संबंध कसे असावें याचें अत्यंत मूलगामी विवेचन केलें आहे. तो म्हणतो, " राज्याने फक्त देशांत शांतता व सुव्यवस्था राखावी आणि परकीय आक्रमणापासून देशाचे रक्षण करावे. बाकी व्यक्तीच्या जीवनात राज्याने ढवळाढवळ करूं नये. मिलने व्यक्तिवादाच्या मर्यादा स्पष्ट करतांना व्यक्तीचें खाजगी जीवन आणि त्याचें सामाजिक जीवन यामध्यें सूक्ष्म रेषा मारली आहे. त्याच्या मते नागरेकांच्या खाजगी जीवनांत त्याला निरंकुश स्वातंत्र्य असेल परंतु सामाजिक जीवनांत त्याला एक मर्यादा पाळावी लागेल. त्याच्यामुळें इतराना कसल्याही प्रकारचा त्रास होता कामा नये. व्यक्तीच्या जीवनाचे मिलने कल्पिलेले हे दोन विभाग अत्यंत महत्वाचे आहेत. तो म्हणतो, " एखादा पोलीस मदिरापान करून घरीं लोळत पडला तरी सरकारला त्याच्या दारूकडे कोपिष्ट नजरेने पाहण्याचे कारण नाहीं." ( On Liberty P. 101 ) परंतु चौकात उभा राहण्यापूर्वी जर तो पिऊन रस्त्याचें नियंत्रण करू लागला तर सरकारने त्याला कोर्टात उभे करावे इतराना इजा पोचणार नसेल तर व्यक्तीनें आपल्या जीवनात अमर्याद स्वातंत्र्य भोगावयाला कोणाचीच हरकत असणार नाहीं.

## समाजवादाकडे झुकलेले विचार

बेन्थॅमच्या वरील उपयुक्ततावादाप्रमाणे मिलने आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात समाजवादी विचाराचा अवलंब केला होता असे वाटते इ. स. १८४८ मध्ये त्याने आपला Political Economy हा ग्रंथ प्रकाशित केला होता त्या वर्षीच मार्क्सने सबंध जगात उलथापालथ करणारा आपला जाहिरनामा प्रसिद्ध केला होता. दोघानाही स्पर्धाप्रधान भांडवलशाही अर्थव्यवस्थेचे भयानक दोष दिसले होते. दोघाच्या प्रतिक्रिया भिन्न होत्या. परंतु मिलने देखील कामगाराची आर्थिक पिळवणूक कमी झाली पाहिजे असे प्रतिपादलें होते. जमिनीची किंवा उत्पादनाच्या साधनाची राष्ट्रीय मालकी असावी असें मिलने कोठेच म्हटलें नाहीं. उलट खाजगी मालमत्ता जोपास-

ण्यासाठीं व्यक्तिवादाचा विचार त्याने मांडला. परंतु व्यक्तीला केवळ राजकीय व सामाजिक स्वातंत्र्य मिळून भागणार नाहीं. त्याला आर्थिक स्वातंत्र्याचे देखील आश्वासन मिळाले पाहिजे असा सूचक विचार त्याच्या लिखाणातून दिसतो.

आर्थिक विषमता नष्ट करण्याकरिता जमीनदाराच्या वाढत्या उत्पन्नावर नियंत्रण असावे असे त्याने प्रतिपादले आहे. त्याचप्रमाणे आर्थिक भारक ( Economic rent ) हें सरकारने स्वतःकडे घ्यावे असेंहि त्याने सांगितले आहे मजुरांना वेतनाबाबत अधिक स्वातंत्र्य असावे, त्याचप्रमाणें मजूरसंघ स्थापन करून त्यांच्या मार्फत मजुरांचे प्रश्न हाताळावे असेही त्याने आपल्या लिखाणातून ध्वनित केलें आहे. कारखानदार आणि मजूर यांच्यातील वर्ग-युद्ध मिलला मजूर नव्हते. परंतु त्याचबरोबर भांडवलदारांना अनियंत्रित स्वातंत्र्य द्यावे असेही त्याला वाटत नव्हते. परस्पर सहकार्यातून हा वर्गविग्रह मिटला तर चांगले होईल असेच त्याचे मत होते. मानवाच्या राजकीय स्वातंत्र्याबरोबर त्याला आर्थिक स्वातंत्र्याचीहि गरज आहे असे विचार मिलने आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धात मांडले आहेत. त्यामुळे मिल हा आजच्या लोककल्याणकारी राज्याचा वा समाजवादी लोकशाहीचा आद्य जनक मानला जातो.

## आदर्शवादाच्या छटा

(३) राज्य आणि व्यक्ति यांचे परस्परसंबंध काय असावे यासबंधीं त्यानें वरील दोन्ही भूमिका मांडल्या. त्याचप्रमाणें त्यानें व्यक्तीच्या खऱ्या इच्छेचा (Real will) विचार राज्याने करावा व त्याप्रमाणें धोरण आखावे असे म्हटले आहे. त्याचा हा ‘ खऱ्या इच्छे ’ वरील भर जर्मनीमधील आदर्शवादाला जवळचा आहे. याबाबत मिल म्हणतो, “ एखाद्या पडक्या पुलावरून व्यक्ति पलीकडे जाऊं लागली तर पूल कोसळून ती व्यक्ति मरण्याचा दाट संभव आहे. त्याची खरी इच्छा मरावे अशी कधींच राहाणार नाहीं. त्याच्या या इच्छेचा विचार करून राज्यानें त्याला पूल ओलांडण्यास प्रतिबंध करावा. ”

## मिलच्या विचारांतील अपुरेपणा

मिलच्या वरील तिन्ही विचारांत आज संदिग्धपणा आणि अपुरेपणा जाणवतो. वैयक्तिक जीवन व सामाजिक जीवन यामध्यें त्याने मारलेली सीमारेषा वादग्रस्त ठरेल. व्यवहारांत ती ठरविणे अवघड जाईल. त्याचें फ्रेंच समाजवादी विचार आज आपणाला केवळ भूतदयावादी वाटण्या-पलीकडे अधिक मोलाचे वाटूं शकत नाहींत. आदर्शवादांतील " खऱ्या इच्छे "चा विचार अधिक ताणला तर त्यांतून अनियंत्रित हुकूमशाही जन्माला येईल. त्यामुळें मिलचा व्यक्तिवाद आज आपणांस साहाय्यक होत नाहीं. परतु त्याने व्यक्तीला दिलेले प्राधान्य आणि त्याच्या आर्थिक सामा-जिक आणि राजकीय स्वातंत्र्यावर दिलेला भर आजच नव्हे तर अनेक शतकें मानवास मार्गदर्शक ठरल्यावांचून राहणार नाहीं.

## स्पर्धाप्रधान समाजव्यवस्थेचा पुरस्कर्ता स्पेन्सर
### ( इ. स १८२० ते इ. स. १९०३ )

जेरेमी बेन्थॅम आणि जॉन स्टुअर्ट मिल यांच्याप्रमाणें स्पेन्सरने देखील एकोणिसाव्या शतकांतील व्यक्तिवाद सामर्थ्यसंपन्न बनविला स्पेन्सरनें या वादाचा पुरस्कार केला तो मात्र त्याच्या आवडत्या प्राणिशास्त्रीय सिद्धान्ता-मुळें. मानवी इतिहासांत व्यक्तिवाद पुष्ट होण्यास धर्मविरोधी बंडें, कायदा-विषयक विचार, तत्त्वज्ञानाच्या अधिष्ठानासंबधीं विचार, आर्थिक क्षेत्रांतील खुली स्पर्धा इत्यादि घटना कारणीभूत झाल्या. तथापि प्राणिशास्त्रांतील निष्कर्षामुळें व्यक्तिवादाचा पुरस्कार करणारा हर्बर्ट स्पेन्सर हा पहिलाच व्यक्तिवादी होय.

सृष्टीमध्यें सतत संघर्ष चालू आहे. जीवन ही एक समरभूमि आहे. या आयुष्याच्या झगड्यांत जो टिकेल तो जगेल. बाकीचे सर्व नष्ट होतील. ( Survival of the fittest ) हा स्पेन्सरचा आवडता सिद्धान्त. मानवी इतिहास हा याच तत्त्वावर उभारला आहे. सबलांनीं तरावें व दुर्बलांनीं नाहींसें व्हावे हाच सर्व इतिहासाचा संदेश आहे. त्यामुळें राज्यानें व्यक्तीच्या

किंवा समाजाच्या जीवनांत कमींत कमी हस्तक्षेप करावा व जास्तींत जास्त या झगड्याला वाव द्यावा असे त्यानें सांगितलें. राज्य जर समाज-व्यवस्थेत ढवळाढवळ करून दुबळ्यांना सरक्षण देईल तर हा सृष्टीचा नियम बिघडेल. जगांत दुर्बळांची संख्या वाढेल. त्यांच्यापासून निर्माण होणारी भावी पिढी देखील जीवनाच्या झगड्यात टिकण्यास अपात्र होऊन केवळ राज्याच्या अनुकंपेवर ती टिकेल. यामुळे समाज म्हणजे दुबळ्यांचा कळप ठरेल. ही आपत्ति टाळावी म्हणून राज्याने समाजजीवनात फक्त अतर्गत यादवी किंवा युद्धचक्राच्या वेळीं फक्त हात घालावा.

## हर्बर्ट स्पेन्सरच्या विचाराची घडण

स्पेन्सरचा हा व्यक्तिवाद घडण्यास तीन गोष्टी कारणीभूत झाल्या.

( १ ) अमर्याद धर्मसत्तेबद्दल तिरस्कार.

( २ ) स्पर्धाप्रधान जीवनावरील निष्ठा.

( ३ ) समाज हा पुरुष आहे ही कल्पना.

( १ ) एकोणिसाव्या शतकांत युरोपमधील धर्मसत्ता घसरगुडीस लागली होती. तरी देखील धर्मगुरूंच्या हातात पुष्कळ सत्ता केंद्रित झाली होती. स्पेन्सरचे वडील त्या काळांत धर्मगुरु आणि धर्मसत्ता याविरुद्ध अनेकवेळां त्वेषानें बोलत. यामुळें स्पेन्सरला देखील कोणत्याही व्यक्तीच्या हातांतील नव्हे, तर संस्थेच्या हातांतील सत्ताकेंद्रीकरणाबद्दल नावड निर्माण झाली.

( २ ) स्पेन्सरचे युग हे स्पर्धाप्रधान युग होतें. आर्थिक क्षेत्रांत अनिर्बंध खुली स्पर्धा चालू होती. तो त्याच्या काळात जवळ जवळ युगदडक होऊन बसला होता. त्याचा परिणाम स्पेन्सरवर झाला नसता तरच आश्चर्य ! त्यांत पुन्हां त्याच्या प्राणिशास्त्रविषयक सिद्धान्ताची भर पडली. (Survival of the fittest ) यामुळें तो कट्टर स्पर्धानिष्ठ बनला.

समाज हा पुरुष असून त्याची देहरचना मानवी शरीरासारखी आहे. व्यक्तीच्या शरीररचनेत प्रत्येक अवयवाकडे कांहीं ठराविक कामें सोपविलेलीं असतात. त्याचप्रमाणें राज्यपुरुषाच्या देहरचनेत व्यवस्था आहे. अतर्गत बंडाळीचा बींमोड व बाहेरून येणाऱ्या शत्रूचा बंदोबस्त एवढीं दोन कामें

सरकारकडे आहेत. त्यानें इतर अवयवांच्या कार्यक्षेत्रांत ढवळाढवळ करणें शरीरशास्त्रास सोडून होईल.

वरील तिन्ही कारणांचा साकल्यानें झालेला परिणाम म्हणजे स्पेन्सरचा व्यक्तिवाद होय. त्याचा हा व्यक्तिवाद दुर्बलाना जगण्याचा अधिकार नाहीं असें सागतो. वास्तविक समाजामध्ये धनिक वर्ग उत्पादनाचीं साधनें आपल्या हातात ठेवून लाखो गरिबांना जगणें अशक्य करून टाकतो. येथें स्पर्धेच्या विचारापेक्षा समाजव्यवस्थेचा भाग अधिक महत्त्वाचा मानावा लागेल. सबळ आणि दुर्बळ ही स्पेन्सरने केलेली विभागणी अत्यंत अशास्त्रीय आहे. प्रत्येक मानवामध्यें अमर्याद सामर्थ्य आहे. माणूस हा पिंडानें स्पर्धाप्रिय असून मानवी इतिहास हा स्पर्धेचा इतिहास आहे हे त्याचे गृहीतकृत्य वरील दोन्ही गोष्टी निराधार आहेत. माणूस स्पर्धावादी आहे, त्याचप्रमाणें तो सहकार्यवादी आहे. मनुष्याचा इतिहास हा प्रामुख्याने त्याच्या सहकारी प्रवृत्तीचा इतिहास आहे असे अलीकडील अनेक विद्वान आग्रहाने माडू लागले आहेत.

जीवनाच्या झगड्यांत लायक तेवढे टिकतील व अपात्र लोक नष्ट होतील हा स्पेन्सरचा सिद्धान्त ज्युलियन हक्स्ले या सुप्रसिद्ध प्राणिशास्त्रज्ञाने खोडून काढला आहे. मोर हा पूर्वी उडणारा पक्षी होता. जगण्याच्या धड-पडीत त्याला लाडोरीभोंवती सतत पिंगा घालून तिचे प्रियाराधन करावे लागे. जीवनाच्या त्याच्या या लढाईत आता त्याची हवेत स्वैरपणें उड्डाण करण्याची शक्तीच नष्ट झाली आहे. आयुष्याच्या झगड्यांत चांगले तेवढेच तरेल याला वास्तवाचा आधार नाहीं.

यामुळेच स्पेन्सरचा व्यक्तिवाद आजची आपली समस्या सोडवू शकत नाहीं. तो आपणांस अराजकवादाकडे नेऊन सोडण्याची शक्यता जास्त आहे.

## ३.... हिंदुस्थानांतील व्यक्तिवादाचा प्रारंभ आणि विकास

युरोपप्रमाणे हिंदुस्थानच्या इतिहासांत व्यक्तिवादी आणि समूहवादी विचारप्रवाहाचा सगतवार इतिहास शोधणे फार कठीण आहे हा संशोधनाचा विषय आहे. तथापि अत्यत त्रोटक आणि ढोबळ मानाने तो पुढीलप्रमाणे सागता येईल.

इ. स. पूर्वीच्या चार हजार वर्षाच्या दरम्यान येथें राज्यसंस्था उदय पावली नव्हती. त्या दंडहीन समाजव्यवस्थेत व्यक्ति आणि राज्य याचे संबंध कसे होते हें अभ्यासण्याची गरज उरत नाही. त्या काळांत व्यक्तीला निसर्गामधील आधळ्या शक्तीपासून नसले तरी राज्यसंस्थेपासून अमर्याद स्वातंत्र्य असावे असे वाटते. त्यानंतर इ स.पूर्वी सातव्या शतकाच्या दरम्यान येथे गणसस्था स्थापन झाल्या असाव्या असें वाटते. या गणराज्यामध्यें व्यक्तीचे सार्वभौमत्व मान्य केलेले असते. किंबहुना तोच अशा राज्याचा पाया असतो. या संस्था निश्चितपणे किती काळ टिकल्या हे सांगणे कठीण आहे. परतु इ.स पूर्वी सहाव्या शतकामध्ये गौतम बुद्धाने या देशातील धर्मसत्तेविरुद्ध जोमदारपणे बंड पुकारलें. यज्ञसंस्था आणि जातिसंस्था यांनी त्या काळाचें सारे जीवन व्यापून टाकले होतें. त्या समाजव्यवस्थेविरुद्ध व्यक्तित्वाचा कोंडमारा होतो म्हणून प्रभावी आवाज उठविणारा महात्मा गौतम बुद्ध हा या देशांतील व्यक्तिस्वातत्र्याचा अत्यंत ठसठशीत प्रारंभ मानावा लागेल. गौतम बुद्धाच्या आधीं ही परंपरा निर्माण करण्याचें श्रेय आपणांस कपिल, कणाद, चार्वाक इत्यादि विचारवंतांना दिले पाहिजे. प्रस्थापित जीवनमूल्यांविरुद्ध स्वतःच्या सदसद्विवेक बुद्धीशीं इमान राखून आपले विचार

व्यक्त करणारे हे महापुरुष व्यक्तिवादाचे प्राचीन भारतातील फार मोठे उपासक मानावे लागतील. गौतम बुद्धाला त्याच्या आधींची मूर्तिभजकांची परंपरा उपयोगी पडली असेल यात शकाच नाहीं. परतु दडहीन संस्था, गणसस्था, चार्वाक, कणाद, गौतमबुद्ध यांचा इ. स. पू. पांचव्या शतकाचा काल ओलाडल्यानतर या विचाराचा उपासक आपणास ढोबळमानाने एकोणिसाव्या शतकाच्या प्रारभापर्यंत आढळत नाही. इ. स. पू. पाचव्या शतकापासून इ स. पाचव्या शतकापर्यंतच्या एक हजार वर्षांत येथील समाजजीवनात अनेक घडामोडी झाल्या. परतु व्यक्तिस्वातन्त्र्याचा विचार माडणारा प्रभावी विचारवत या कालखडात आढळत नाहीं. इ. स. पाचव्या शतकापासून इ. स. अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत येथील सर्वच जीवन स्थितिशील बनले होते पुरोहितांची धर्मसत्ता, क्षत्रियांची राजसत्ता आणि सरदारांची अर्थसत्ता यांच्या ओझ्याखाली व्यक्तींचें स्वतत्र जीवन गुदमरून गेले होतें. त्यांतून मध्य आशियांतून आलेल्या तुर्क, अफगाण, मोगल याच्या वारवार स्वाऱ्यामुळे येथील समाजव्यवस्थेला अधिक जड स्वरूप प्राप्त झाले.

सामान्यपणे असे म्हणावयाला हरकत नाही कीं येथील जीवनावर तीन विचाराचा अत्यंत प्रभाव पडला होता.

(१.) जातिव्यवस्था.

(२) राजा हा विष्णूचा अंश ही कल्पना.

(३) पारमार्थिक मूल्ये हीं जीवनांतील सर्वश्रेष्ठ मूल्यें.

जातिव्यवस्थेने माणसाचे श्रेष्ठत्व किवा नीचत्व हें जन्माने ठरविलें. या व्यवस्थेनें या देशांतील लाखों अस्पृश्याना साधे व्यक्तिमत्व नाकारले. ही व्यवस्था व्यक्तिस्वातंत्र्याशीं सुसवादी राहू शकत नाहीं त्याचप्रमाणें 'राजा हा ईश्वरी अंश आहे' या कल्पनेप्रमाणें त्याच्या हातांत अनेक शतके येथें अनियंत्रित सत्ता केंद्रित झाली होती. हा विचार शांतिपर्वाच्या काळापासून पेशवाईपर्यंत आमच्याकडे सुस्थिर होता. त्याचप्रमाणें धार्मिक मूल्यांमुळे

कांहीं प्रमाणांत ऐहिक व्यक्तिवादाला गौणस्थान मिळणे स्वाभाविक होतें. या सर्वसामान्य प्रवृत्तीशिवाय भारतीय इतिहासांत येथील व्यक्तीचें जीवन, त्याचे विचार, आशा–आकाक्षा यांची नोंद आढळत नाहीं. तो शेती करीत असे व कर भरत असे. कधीं या बाजूस तर कधीं त्या बाजूस अशा प्रकारे तो सैन्यात सामील होई. त्याच्या धर्माने त्याला सर्व संसार ही माया आहे हे शिकविले होते. मोगल व मराठा साम्राज्ये नष्ट होऊन ब्रिटिश आल्यावर सुरक्षिततेला महत्व आले. यानंतरच लोकाना स्वातंत्र्याचा विचार करावासा वाटला. भारतामधील व्यक्तिस्वातंत्र्यवादी विचारपरंपरा इ. स. पू. पाचव्या शतकात खडित झाली होती. ती एकोणिसाव्या शतकांत पुन्हा सुरू झाली.

## भारतीय जीवन गतिशून्य कां ?

सामान्यपणे असे दिसते कीं या देशात इ. सनाच्या पाचव्या शतकापासून इ. सनाच्या अठराव्या शतकापर्यंत व्यक्तिस्वातत्र्याचाच नव्हे तर कोणताच विचार येथें प्रगत झाला नाहीं. त्याचप्रमाणें इ. स. पू. पांचव्या शतकापासून तो इ. सनाच्या पांचव्या शतकापर्यंत इतर विचाराची थोडी फार वाढ झाली असली तरी व्यक्तिवादाचा विचार मात्र या भूमींत रुजूं शकला नाहीं. म्हणजे इ. स. पू. पांचव्या शतकापासून इ. सनाच्या अठराव्या शतकापर्यंत जवळजवळ तेवीसशें वर्षें व्यक्तिस्वांतंत्र्याची अत्यंत प्रबळ प्रेरणा येथें हतप्रभ ठरली. याची मीमांसा आपणांस तीन प्रकारें करतां येईल:

( १ ) जातिव्यवस्था.

( २ ) ग्रामीण अर्थव्यवस्था.

( ३ ) बहुसत्तावाद.

जगाच्या पाठीवर कोठेंहि न दिसणारी जातिव्यवस्था येथेंच कशी जन्माला आली ? मूळच्या वर्णव्यवस्थेला जातिव्यवस्थेचें विकृत स्वरूप या देशांत केव्हां आणि कां आले ? इत्यादि मूलभूत प्रश्न आपणांस सोडविलां

आले नाहींत तरी एवढें म्हणावयास हरकत नाहीं कीं या व्यवस्थेमुळे येथें निकोप व्यक्तिस्वातंत्र्याचा उदय होऊं शकला नाहीं. कारण या व्यवस्थेमुळें माणसाचे सारे जीवन केवळ त्याच्या जन्मामुळें ठरले जात होते. व्यक्तींच्या अमर्याद स्वातंत्र्यावर या जातिबद्ध समाजव्यवस्थेमुळे फार मोठे बंधन पडत होतें. शिवाय या व्यवस्थेचें ओझें समाजमनावर इतके जबरदस्त होतें कीं त्याविरुद्ध आवाज उठविणे जवळजवळ अशक्य होते. व्यक्तिस्वातंत्र्याच्या विचाराला ग्रहण लावणाऱ्या या जातिव्यवस्थेला आत्म्याच्या पुनर्जन्माच्या सिद्धान्तामुळें सातत्य लाभलें.

माणसाचा हा जन्म त्याच्या मागच्या पूर्वजन्मीच्या पापपुण्याच्या सचया-प्रमाणें होत असतो या श्रद्धेमुळे जातिव्यवस्था दृढमूल झाली त्याच्या सामाजिक विषमतेचे मूळ अज्ञात पूर्वजन्मामध्ये आहे असे धर्मशास्त्रानीं त्याला सागितल्यामुळे तो अगतिक किंवा दैवाधीन बनला. जातिव्यवस्थेचा कणा म्हणूनच आपणांस गतजन्मीच्या सिद्धान्ताचा उल्लेख करावा लागेल.

जातिव्यवस्थेप्रमाणे ग्रामीण अर्थव्यवस्थेमुळेदेखील येथील जीवन एखाद्या साचलेल्या पाण्याप्रमाणे गतिशून्य बनले होते. बलुते पद्धतीमुळे अनेक शतके प्रत्येक खेडें हे आर्थिक आणि सामाजिक दृष्ट्या एक स्वयंपूर्ण घटक बनले होते. इतर समाजाशीं दळणवळण करण्याची त्याला गरज वाटत नव्हती. या स्वयंपूर्ण ग्रामव्यवस्थेतून स्थितिशीलता आली व तिचा परिणाम म्हणून येथील व्यक्तिवादाबरोबर इतर सर्वच वैचारिक जीवन अनेक शतकें खुरटून गेले.

त्याचप्रमाणें येथील व्यक्तिस्वातंत्र्यावरील आक्रमणस्थाने निरनिराळ्या केंद्रामध्ये विखुरलीं होतीं. पुरोहितांच्या हातांत धर्मसत्ता, क्षत्रियाच्या हातात राजसत्ता व सरदाराच्या हातांत अर्थसत्ता या समाजात विभागली होती. युरोपप्रमाणें या सर्व सत्तांचे केंद्रीकरण येथें एका ठिकाणीं झालें नव्हते. व्यक्तिस्वातंत्र्यावर पडणारीं हीं बंधनें निरनिराळ्या ठिकाणीं होती. त्यामुळें त्यांचे बलस्थान त्याला एके ठिकाणीं सांपडत नव्हतें. तें युरोपच्या जीवनात तिकडील व्यक्तिवाद्यांना धर्मसंस्थेत सांपडलें होतें. शिवाय येथील

व्यक्तिस्वातंत्र्यावरील आक्रमण निरनिराळ्या क्षेत्रातून चालू असल्यामुळें त्याची तीव्रता येथील व्यक्तींना कधीं बोचत नव्हती. वरील तिन्ही कल्पनाना आमच्या हाडींमासी खिळलेल्या दैववादानें हातभार लावला. त्यामुळे येथील व्यक्तिवादाचा विचार तेवीसशें वर्षें येथील जीवनात गाढ निद्रिस्त राहिला. इंग्रजाच्या साहचर्याने अनेक शतकाची त्याची झोप चाळवली जाऊन त्याचें पहिले चलनवलन सुरू झाले.

एकोणिसाव्या शतकामध्यें व्यक्तिस्वातंत्र्याचा विचार महत्त्वाचे मानणारे चार विचारप्रवाह देशांत निर्माण झाले.

( १ ) सामाजिक, धार्मिक, राजकीय क्षेत्रात उदारमतवादी विचाराचा पुरस्कार करणारे न्यायमूर्ति रानडे, गोखले इत्यादींचा विचारप्रवाह.

( २ ) रूढिप्रामाण्यावर आघात करून ब्राह्मो समाज स्थापन करणारे राजा राममोहन रॉय इत्यादि समाजसुधारकाचा विचारप्रवाह.

( ३ ) बुद्धिप्रामाण्यवादाची परपरा महाराष्ट्रात निर्माण करणाऱ्या आगरकराची विचारप्रणालि.

( ४ ) सामाजिक विषमतेविरुद्ध बहुजन समाजाचा आवाज उठविणारे म. ज्योतिराव फुले याचा विचारसप्रदाय.

विसाव्या शतकामध्ये व्यक्तिवादाचा जोमदार रीतीनें पुरस्कार करणारे दोन विचारवंत या देशात होऊन गेले :

( १ ) म. गाधी.

( २ ) मानवेद्रनाथ रॉय.

त्यांच्यापैकीं फक्त म. गांधींच्या विचारांचा परामर्श येथें घेण्याचें ठरविले आहे.

**महात्मा गांधी** **( इ. स. १८६९ ते इ. स. १९४८ )**

**म. गांधींच्या राजकीय विचारांचा परामर्श घेतांना आपणांस दोन तीन गोष्टी सतत मनांत बाळगल्या पाहिजेत.**

( १ ) म. गांधींनीं राज्यशास्त्राचा स्वतंत्रपणें कधींच विचार केला नाहीं. त्यामुळे व्यक्ति व समष्टि यांचे संबंध काय असावेत यावर स्वतंत्र असे त्याचे स्वतःचे ग्रंथ वा लिखाण उपलब्ध नाहीं. त्यांच्या अनेक पुस्तकातून व मुलाखतींतून आपणांस हे विचार शोधावे लागतात.

( २ ) राज्यशास्त्रविषयक वा इतर विचार हे त्याच्या जीवनविषयक अध्यात्मिक विचारातून विकसित झाले आहेत. आयुष्याच्या व्यापक, अध्यामिक तत्त्वज्ञानाचा एक घटक म्हणून आपणास त्याच्या विचारांचा अभ्यास केला पाहिजे.

( ३ ) सुसगतवार आणि शास्त्रीय दृष्टीनें त्यानीं या विषयावर विवेचन केलेले नसल्यामुळे त्याच्या लिखाणात परस्पर विसगति आढळून येते. तरी देखील त्याच्या कांहीं कल्पना व्यक्तिस्वातत्र्याच्या दृष्टीनें अत्यत मोलाच्या मानाव्या लागतील. त्यात प्रामुख्याने त्याच्या तीन विचाराचा अतर्भाव करावा लागेल.

( १ ) विकेद्रीकरण.
( २ ) सत्याग्रह.
( ३ ) साध्यसाधनसवादित्व.

## म. गांधींच्या विकेंद्रीकरणाची निराळी बैठक

म. गांधींनीं विकेद्रित अर्थव्यवस्थेवर फार मोठा भर दिला आहे. त्याची विकेद्रित अर्थव्यवस्था व्यक्तिस्वातंत्र्याला मोठी उपकारक ठरणार आहे. कारण सत्तेचें विकेद्रीकरण हा व्यक्तिवादाचा मूलाधार आहे. परंतु म. गाधींची विकेंद्रीकरणाची कल्पना आणि जगांतील इतर विचारवंतांची विकेंद्रीकरणाची कल्पना यामध्ये मुख्यतः दोन प्रकारचे फरक आहेत

(१) म. गाधीचा यंत्रयुगाला आणि पर्यायाने केंद्रीकरणाला विरोध आहे. तो मुख्यतः नैतिक दृष्टिकोनांतून. यंत्रयुगानें मनुष्य नीतिभ्रष्ट होतो. त्याला कोंबड्याप्रमाणें खुराड्यात रहावे लागते. तेथील कोंदट आणि घाणेरड्या वातावरणानें त्याच्या निरामय शरीराबरोबर त्याचें निकोप मनहि

रोगट बनते. यंत्रामुळे जागतिक युद्धे, बेकारी, आर्थिक मंदीची लाट इत्यादि उद्‌भवतात. थोडक्यात यंत्रयुगामुळे मनुष्यातील नैतिक प्रेरणा आणि मूल्ये मलिन होतात. अशा यंत्रयुगापासून आणि तज्जन्य केंद्रीकरणापासून मानवाने अलिप्त रहावे. यामध्ये म. गांधींनीं माणसाच्या भौतिक स्वातंत्र्यापेक्षां त्याच्या नैतिक आरोग्याला अधिक प्राधान्य दिलें आहे.

( २ ) म. गांधींनीं विकेंद्रीकरणाचा पुरस्कार केला आहे. परंतु त्याचे विकेंद्रीकरण इतरासारखे आर्थिक विकेंद्रीकरण नाही, तर तें मुख्यतः सर्व सामाजिक जीवनाचे विकेंद्रीकरण आहे. ते आर्थिक विकेंद्रीकरणाच्या निष्कर्षाला येत असलें तरी त्याची सुरवात ही सामाजिक विकेंद्रीकरणापासून आहे. थोडक्यात त्याच्या तत्त्वज्ञानामध्यें आर्थिक विकेंद्रीकरण हे कार्य आहे, कारण नव्हे.

म. गांधी आणि इतर विचारवंत याच्या विकेंद्रीकरणाच्या धोरणासंबंधीं वरील दोन्ही बाबतींत महत्त्वाचा फरक आहे. परंतु तरी देखील म. गांधींचा हा विचार व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने महत्त्वाचा मानावा लागेल.

म. गांधींच्या या विचारात आधुनिक दृष्टीने एकच उणीव आहे. त्यानी यंत्रयुगाला पर्याय म्हणून मध्ययुगीन ग्रामीण अर्थव्यवस्थेचा उपाय सुचविला आहे. महायंत्रोत्पादनाला व्यक्तिवाद्याचा विरोध असला तरी म. गांधीचा हा मार्ग आज अभ्यासूना कितपत रुचेल याबद्दल शंका आहे. कारण आजच्या युगाची समस्या मुख्यतः अशी आहे कीं त्याला यंत्रापासून मिळणारी कार्यक्षमता हवी आहे परंतु त्याचबरोबर त्यापासून निर्माण होणारी केंद्रित अर्थव्यवस्था टाळावयाची आहे विकेंद्रित अर्थव्यवस्थेपासून मिळणारे व्यक्तिस्वातंत्र्याचे आश्वासन त्याला पाहिजे आहे. त्याचबरोबर यंत्रोत्पादनाची द्रुतगति आणि सफाई त्याला हवी आहे. या दोहोंमध्यें समन्वय कसा साधावयाचा हा त्याचा प्रश्न आहे. म. गांधींचे स्वयंपूर्ण ग्रामराज्य काळाची ही गरज भागविण्यास असमर्थ आहे.

## सत्याग्रहाचा नवा विचार

म. गांधींच्या स्वयंपूर्ण ग्रामव्यवस्थेप्रमाणे सत्याग्रहाचा त्याचा विचार व्यक्तिवादाच्या दृष्टीने अभिनव आणि महत्त्वपूर्ण मानावा लागेल. म. गांधींच्या पूर्वी हा विचार व त्याचे प्रात्यक्षिकीकरण अन्य ठिकाणीं झालें होतें. इ. स. १९०१ ते १९०५ पर्यंत फिनलंडमधील लोकांनीं रशियन अत्याचाराला अनत्याचारी मार्गाने प्रत्युत्तर दिले होतें. इ. स. १८६१ मध्ये हंगेरियन लोकांनीं अहिंसामय आणि असहकारी लढ्याला भरघोस यश मिळविले होते. बिस्मार्कच्या जुलमाविरुद्ध जर्मनीमध्यें सत्याग्रही पद्धतीनें दोन झगडे यशस्वी झाले होते. इजिप्तमध्ये इंग्रजी जाचाविरुद्ध सनदशीर प्रतिकार आणि असहकार यांचा प्रयोग फलदायी झाला होता. पर्शियन लोकांनीं तंबाखूच्या मक्तेदारीविरुद्ध बहिष्काराचे शस्त्र उपसले होत. ब्रिटिश सैनिकांनीं चिनी विद्यार्थ्यांवर गोळ्या झाडल्या होत्या. तेव्हा त्यांनी देखील ब्रिटिश मालावर बहिष्कार घालून या मार्गाचा अवलंब केला होता. परंतु जगातील या सर्व पद्धतींत आणि म. गांधींच्या सत्याग्रहाच्या पद्धतींत मूलगामी फरक आहे. म. गांधींनीं इतर कोणालाही न देता आलेली तत्त्वज्ञानाची बैठक या प्रयोगाला दिली. त्या मागील विधायक तत्त्वज्ञान असें कीं प्रत्येकाच्या अंत:करणात परमेश्वर आहे. आत्मक्लेशानें आपण जर त्या निद्रिस्त ईश्वराला जागे केले तर तो मनुष्य पुन्हां सन्मार्गावर येऊं शकतो. म. गांधींच्या सत्याग्रहाला हे जे विशाल विचाराचे अधिष्ठान लाभले तें इतरत्र कुठेही सापडणार नाहीं.

## आजच्या लोकशाहींत सत्याग्रहाचें स्थान

सत्याग्रहाचें महत्त्व आजच्या लोकशाहीच्या काळांत आणखी एका दृष्टीने मोलाचें मानावे लागेल. आजच्या प्रातिनिधिक लोकशाहींत सरकार एकदां निवडलें गेलें म्हणजे त्याला जनतेकडून पांच वर्षांचा करार लिहून मिळतो. या मध्यंतरीच्या काळांत जनमत कितीही वेगाने बदलले तरी सरकार त्याची दखल घेईलच याची हमी नाहीं. निवडणुकींत दिलेल्या

आश्वासनांचा भंग करून सरकार जर अन्याय्य कायदे जनतेवर लादूं लागलें तर फक्त दोनच मार्ग शिल्लक उरतात.

(१) शस्त्र हातांत घेऊन ते सरकार उलथून पाडणे.

(२) कसलाही प्रतिकार न करतां पाच वर्षे सर्व जुल्म निमूटपणें सहन करणें. वरील दोन्ही मार्ग त्याज्य किंवा हानिकारक आहेत. या दृष्टीने या कोंडीतून बाहेर पडावयास सुचविलेला एक मार्ग म्हणजे सत्याग्रह हा होय. व्यक्तीचे व्यक्तिमत्त्व चिरडले जाऊं नये म्हणून सत्याग्रहाचा सदनशीर प्रतिकाराचा हा मार्ग व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें महत्त्वाचा म्हणावा लागेल. या मार्गांत अत्याचारी रक्तपात नाही किंवा प्रातिनिधिक लोकशाहीमधील अगतिकता नाहीं.

परंतु सत्याग्रहाचा हा मार्ग लोकशाही यंत्रणेशी कितपत सुसंगत ठरेल ? त्याचे पर्यवसान बेदिली किंवा यादवी युद्धात होणार नाहीं काय ? कारण या शस्त्राचा वापर कोणी आणि केव्हा करावयाचा याबद्दल म. गांधींनीं कांहींही खुलासा केला नाहीं. त्या मार्गाच्या उपयोगासाठीं म. गांधींनीं कोणताही वस्तुनिष्ठ निकष इतरांना सांगितला नाही. तो निकष सर्वस्वी आत्मनिष्ठ होता. शिवाय त्याच्याही बाबतींत तो त्यांच्या ' आतल्या आवाजा 'वर अवलंबून होता. अशा वेळीं या सत्याग्रहाच्या उपयुक्ततेबद्दल शंकांचें काहूर टीकाकाराच्या मनात निर्माण झाले नाही तरच आश्चर्य ! शिवाय अशा निश्चित मानदंडाशिवाय या शस्त्राचा उपयोग सर्रास होऊं लागला तर राज्ययंत्र अर्धांगवायु झाल्यासारखें कोलमडून पडेल. कायदेभंग आणि सरकारी यंत्रणेशीं असहकार यामुळें देशात यादवी युद्ध माजण्याची भीति स्वाभाविक वाटते. अशा वेळीं ही कल्पना लोकशाही यंत्रणेशीं व व्यक्तिवादाशीं कितपत सवादी ठरेल हे सांगणे कठीण आहे.

## साधन शुचिता

वरील दोन्ही विचारांप्रमाणे साधनशुचितेचा म. गांधींचा विचार व्यक्तिस्वातंत्र्याशीं अत्यंत निगडित आहे. साध्य उच्च असलें तर साधनें देखील

उच्च असावींत ही म. गांधींची शिकवण अत्यंत मूलगामी आहे. साध्य हस्तगत करण्यासाठीं वाटेल तीं साधनें वापरावीत असा विचार साम्यवादानें सांगितला. या विचारात दोन धोके आहेत. ध्येय आणि धोरण यामध्ये विसवाद असला तर ध्येयाची प्राप्ति होईलच असे सागतां येत नाहीं. याचें प्रत्यतर रशियाच्या इतिहासांत उत्कृष्ट रीतीने आले आहे. राज्यविहीन समाजरचनेचे ध्येय साध्य करण्यासाठीं त्यानीं साधन वापरले कोणते तर अनियत्रित रीत्या बलशाली झालेले राज्य ! या साध्यसाधन विसगतीमुळे त्याचे मूळ ध्येय आता त्याच्यापासून जास्त जास्त दुरावत चालले आहे. आणि दुसरे असे कीं आपण आपल्या साध्यप्राप्तीसाठीं वाममार्गाचा आश्रय केला तर आपले साध्य त्याच्याहूनही वाईट मार्गानें आपल्यापासून हिरावून घेण्याचा इतराना सपूर्ण नैतिक अधिकार आहे. ‘ ध ’ चा ‘ मा ’ करून आनदीबाई राज्य मिळवू पाहील तर तिच्यापेक्षाही अधिक कपट नीतीने तिचा उच्छेद करण्याचा मार्ग इतराना मोकळा आहे. म. गांधींनीं यादृष्टीने साध्यसाधन संवादित्वावर दिलेला भर अत्यत महत्त्वाचा आहे. व्यक्तिस्वातंत्र्याचे ध्येय साध्य करण्यासाठीं त्याला पोषक अशीच साधने आपण निवडली पाहिजेत.

राज्य आणि व्यक्ति याचे परस्पर संबध कसे असावेत यादृष्टीने म. गाधींनी सागितलेल्या विचारात साधनशुचितेला फार मोठे स्थान द्यावे लागेल. म. गाधींच्या स्वयंपूर्ण ग्रामराज्याचा विचार किंवा सत्याग्रहाचा आचार आजच्या व्यक्तिस्वातत्र्याशीं कितपत जुळणारा आहे याबद्दल वाद होणे शक्य आहे. परतु साधनशुचितेचा त्याचा विचार वादातीत मानावयाला हरकत नाहीं. राज्यशास्त्राला त्यांनी दिलेले हे विचारधन मानव अनेक शतके अभिमानाने जतन करून ठेवील.

व्यक्तिवाद्याप्रमाणें अराज्यवाद्यानीं देखील व्यक्तिस्वातंत्र्यासंबंधी आपले राजकीय विचार विविध ग्रथांतून माडले आहेत. अराज्यवादी विचाराचा अभ्यास करताना एक मोठी अडचण अभ्यासकासमोर उभी राहते. ती म्हणजे अराज्यवादी विचारवतांच्या निरनिराळ्या विचारामध्यें विविध विचारांच्या निरनिराळ्या छटा इतक्या आहेत कीं त्याच्यासंबधीं सामान्य विधाने करणे बरेच कठीण आहे. त्याच्यामध्ये काऊट लिओ टॉलस्टॉय, प्रूधॉ (Proudhon) याच्यासारखे अध्यात्मवादी अराज्यवादी आहेत. तर मायकेल बकूनीन (Michel Bacunin) याच्यासारखे कट्टर नास्तिक अराज्यवादी आहेत. स्टर्नरसारखे अत्याचारी मार्गाचा अवलब करणार हिंसावादी अराज्यवादी आहेत तर टॉलस्टॉयसारखे संपूर्ण अहिसा-वादी अराज्यवादी आहेत. त्याचप्रमाणे राज्यविहीन समाजरचनेचे त्यानीं रगविलेले चित्र देखील निरनिराळे आहे. अराज्यवादाचे निर्णायक विवरण करणारा एकहि अराज्यवादी राज्यशास्त्रामध्ये दाखविता येणार नाहीं. त्यामुळेच या विचारशाखेबद्दल विधाने करताना अत्यत सावधगिरी बाळगणें जरूर आहे. अराज्यवाद्यांतील विचाराचे विविध ओहोळ लक्षात घेऊन देखील स्थूलमानाने त्याचा प्रवाह दिग्दर्शित करणे जरूर आहे.

### अराज्यवाद म्हणजे अराजक नव्हे !

अराज्यवादाचा अभ्यास करण्यापूर्वीं त्यासबंधीं जो मोठा अपसमज सगळीकडे रूढ आहे तो दूर करणे जरूर आहे. अराज्यवाद म्हणजे अव्यवस्था, अनागोंदी कारभार, बंडाळी, रक्तपात इत्यादि कल्पना आपल्या डोळ्यासमोर येतात. अराज्यवादाशीं अत्याचार, बेदिली या कल्पना कां निगडित झाल्या हे सागता येत नाहीं. परतु त्याला प्रमुख कारण आपली राज्याबद्दलची असणारी प्रचलित कल्पना असावी. राज्य म्हणजे शातता, सुव्यवस्था, स्थैर्य अशी आपली सोपी सुटसुटीत व्याख्या असते. ऑक्सिजन-

वाचून श्वसनक्रिया अशक्य त्याचप्रमाणे राज्यावाचून सुव्यवस्था अतर्क्य अशी ढोबळ कल्पना आहे. माणसाला राज्यावर सर्वस्वी अवलंबून राह-ण्याची जी सवय गेल्या अनेक शतकामध्यें लागली, तिचा परिणाम म्हणून देखील वरील कल्पना रुढ झाली असावी. कारण कांहींही असले तरी अराज्यवादाशीं अव्यवस्थेचा संबध जोडून आपण जे मोकळे होतो ते अयोग्य आहे एवढे खरे ! हा अपसमज जितक्या लवकर दूर होईल तितके बरे ! अराज्यवाद्याच्या दृष्टीनें हा वाद म्हणजे बेदिली आणि अत्याचार नव्हेत; तर उलट सध्यांच्या राज्यातील शांततेपेक्षा आणि सुव्यवस्थेपेक्षां अधिक सौख्यदायक सवादी जीवन आहे. याबाबत सुप्रसिद्ध अलेक्झांडर बर्कमन म्हणतो, " अराज्यवाद म्हणजे बॉम्ब, अव्यवस्था अथवा गोंधळ नव्हे अथवा चोरी, खून, साऱ्या जगाशीं युद्ध, रानटीपणा असे काहींही नव्हे, त्याच्या अगदीं उलट अशी सुव्यवस्था अराज्यवादाने निर्माण होईल. अराज्यवादाचा आग्रह असा आहे कीं तुम्ही स्वतंत्र झाले पाहिजे, कुणीही तुम्हाला गुलाम करूं नये. तुमच्यावर वर्चस्व गाजवू नये. तुम्हाला लुटू नये. तुमच्यावर सक्ती करू नये तुम्हाला हवे तें करण्याची व नको ते न करण्याची मुभा असावी. तुम्हाला हवे तसे जगता यावे, त्याला कोणाचाहि अडथळा येऊ नये. तुमच्याखेरीज इतरांनाहि तुम्हासारखे हे सर्व स्वातंत्र्य असावे. सर्वांचे हक्क आणि सर्वांचे स्वातंत्र्य सारखेच असावे. सर्वांत बंधुभाव असावा आणि सर्वांनीं सौजन्याने, सलोख्याने आणि शांततेनें नांदावे. युद्ध, अत्याचार, मक्तेदारी, जुलूम असले काहींही नसावे. थोड-क्यात म्हणजे सर्व स्त्रीपुरुष स्वतंत्र व समजूतदारपणाने सामाजिक जीवनाचा सारखाच आनंद ज्यायोगे उपभोगतील तो विचार म्हणजे अराज्यवाद होय " अराज्यवाद अशा खंबीर विचारावर अधिष्ठित झालेली एक प्रमुख राजकीय विचारशाखा आहे एवढे लक्षांत घेतले म्हणजे पुढील अभ्यासाला बरीच मदत होईल.

**अराज्यवादाचे उगमस्थान.**

अराज्यवादी विचारवंतांचा पंथ प्रथम युरोपमध्यें दिसतो कीं हिंदुस्थान-मध्यें सांपडतो हा संशोधनाचा प्रश्न आहे. परंतु या विचाराची पहिली

शाखा हिंदुस्थानांत असावी या तर्काला बराच आधार आहे. महाभारतातील शांतिपर्वात अराज्यवादी विचाराचा उल्लेख पुढील श्लोकात आढळतो :

नैव राज्यं न राजाऽसीत् । न दण्डो न च दण्डिकः ॥
स्वधर्मेण प्रजास्तावत् । रक्षन्ति स्म परस्परम् ॥

( तेव्हा राज्य नव्हतें व राजाही नव्हता. दण्ड अथवा दण्डधारी कोणीही नव्हता. प्रजा स्वधर्मानें चालून परस्पराचे रक्षण करी. )

परंतु ही शासनविरहित समाजपरिस्थिति फार काळ टिकली नाहीं. मात्स्य न्याय माजला तेव्हा मनूस प्रजेने ' राजा हो ' अशी विनती केली. पण ' मला अपराध्यास शासन करावे लागून माझ्या हातून पाप घडेल ' म्हणून राजपद घेण्यास मनू का कू करू लागला, तेव्हां " आम्ही तुला आमचें पुण्य अर्पण करतो " असे प्रजेने त्यास सांगितले व मनूने नतर राजपद स्वीकारलें अशी भारतात कथा आहे. हीं कथा सर्वस्वी खरी नसली तरी ती वस्तुस्थितीनिदर्शक असावी असे वाटतें. महाभारताचा काल लक्षांत घेता ही शासनविरहित समाजस्थिति किंवा या विचाराचा पंथ या देशात फार प्राचीन काळीं इ. स. पूर्वी चार हजार वर्षे असावा असा अभ्यासकाचा तर्क आहे. हिंदुस्थानप्रमाणे युरोपांत अराज्यवादी विचारवंताचा वर्ग फार पूर्वींच उदयाला आला. झेनो, कर्पोक्रेट्स् जोहान्स स्पिनर (Johannes Spinner) इत्यादि अराज्यवादी तेथील या विचाराचे जनक आहेत. अराज्यवादी विचार जरी प्रथम हिंदुस्थानांत जन्माला आलेला असला तरी हिंदुस्थानपेक्षा युरोपातच या विचारशाखेची सखोल व शास्त्रशुद्ध चर्चा झालेली आहे.

## राज्य हेंच सर्व अनर्थांचें मूळ

अराज्यवाद्यांच्या विचाराप्रमाणे व्यक्तिविकासाच्या मार्गातील सर्वात मोठी धोंड कोणती असेल तर ती राज्यसंस्था होय ! राज्य हें मुख्यत: धनिक वर्गाच्या हातांतील पिळवणुकीचें हत्यार आहे.

राज्यातील उत्पादनाचीं साधने खाजगी मालकीचीं असतात. कार-खाने, गिरण्या, बॅंका इत्यादि उत्पादनाच्या साधनांवर भांडवलदारांची मालकी असते. कारखान्यांतून किंवा गिरण्यांतून मालकवर्ग काम-गाराना कामास जुपतात. त्याच्याकडून भरपूर श्रम करून घेतात आणि त्याने पाच रुपयाचे उत्पादन केलेलें असले तर मजुरीच्या रूपांत त्याला फक्त एक रुपया देतात. बाकीचे चार रुपये धनिकवर्ग केवळ मालकी हक्काच्या जोरावर आपल्या खिशात टाकतो. मजुराच्या श्रमधनाची ही चोरी अथवा राजरोसपणे त्याच्या वाजवी मजुरीवर घातलेला हा दरोडा आहे. श्रमिक वर्ग धनिकाविरुद्ध या पिळवणुकीबद्दल सशस्त्र बड वा उठाव करूं शकत नाहीं. कारण राज्याने या वर्गाला आश्रय दिलेला असतो. समाजामध्ये दारुण विपन्नावस्था दिसते. याचे कारण पिळणूक करणाऱ्या भांडवलदाराना मिळणारें राज्याचें संरक्षण ! चोरी, अनीति, वेश्यांचा शरीरविक्रय यांसारखीं कुकर्मे हीं केवळ या गरिबींतून जन्माला येणारीं दुष्ट अपत्यें होत. समाजात जे रोगट वातावरण पसरते आणि जी निंद्य कृत्यें घडतात त्यांच्या मुळाशीं अपरपार दारिद्र्य हेंच महत्त्वाचे कारण असतें. आणि गरिबी ही केवळ राज्यामुळें अस्तित्वांत येते. व्यक्तींच्या विनाशाला त्यामुळें राज्य हीच संस्था कारणीभूत होतें. राज्य सर्व अनर्थाचें मूळ असल्यामुळें ते नष्ट झाले पाहिजे.

## अराज्यवादी व साम्यवादी

अराज्यवादी आणि साम्यवादी यांनीं शासनमुक्त समाजरचनेचे रंग-विलेले चित्र पुष्कळसें सारखें आहे. राज्याच्या स्वरूपासंबंधीं त्याची मीमांसा परस्परांशीं जुळती आहे. परंतु साम्यवाद्याना शासनमुक्त समाजरचनेकडे जाण्यापूर्वी एक पायरी म्हणून कामगाराचें राज्य स्थापन होणे जरूर वाटते. त्यांच्या मतें भांडवलशाही समाजरचना आणि साम्यवादी शासनविरहित समाजव्यवस्था यांच्या संधिकालांत एका बलवान् कामगारराज्याची आव-श्यकता आहे. कारण या संक्रमणावस्थेंत भांडवलशाहीचे हितरक्षक या नव्या

व्यवस्थेचा विध्वंस करण्यास टपलेले असतात. त्यांच्यापासून संरक्षण व संवर्धन करण्यासाठीं बलवान् 'कामगार राज्य' स्थापन झालेच पाहिजे.

अराज्यवाद्याच्या दृष्टीने कामगार राज्याची कल्पना व्यक्तिविकासाच्या हेतूशीं प्रतारणा करणारी आहे. कारण कामगारराज्यात वर्ग नष्ट झाल्यामुळे धनलोभ राहणार नाहीं. परतु सत्तालोभ कसा नष्ट होणार ? आणि सत्ता-लोभ हा धनलोभापेक्षा अधिक हानिकारक असतो हे सिद्ध करावयाला फारसे प्रयास पडणार नाहींत. या कामगारराज्यात सत्तालालसा, माणसांचे व्यवहार विकृत करून टाकील. सत्तेच्या घाणेरड्या खेळामध्ये त्याची निरामय, निकोप नाती मलिन होऊन जातील. त्यामुळे सधिकालात देखील राज्य राहणें व्यक्तिहिताला पोषक ठरणार नाही.

## अराज्यवादी व समाजवादी

साम्यवाद्याप्रमाणे समाजवादी देखील शासनमुक्त समाजरचनेचे ध्येय आपल्या नजरेसमोर ठेवतात. राज्य हे गरीबांचे आणि पर्यायाने सर्व आपत्तींचे मूळ आहे हे ते मान्य करतात. परंतु त्याच्या मतें राज्याधिष्ठित समाज-रचनेकडून राज्यविहीन समाजव्यवस्थेकडे जाताना फार सावकाश, मंद गतीने गेलें पाहिजे. झटपट बदल अनिष्ट ठरेल.

याबाबत अराज्यवाद्याचें त्यांना उत्तर असें का राज्याचे अरिष्ट एकदां तुम्ही मान्य करतां ना ? मग ही दिरंगाई किंवा सबूरी कां ? राज्य नष्ट झालें पाहिजे हा निर्णय एकदां घेतला म्हणजे मग त्यासाठीं कालापव्यय कशासाठीं ? एखादा दांत किडलेला आहे आणि त्यामुळें इतर दातांना कीड लागण्याची भीति आहे. मग तो दांत त्वरित उपटून टाकावयाला नको का ? अराज्य-वादी आणि समाजवादी यांच्या विचारातील हा फरक महत्त्वाचा आहे.

## सहकार्य हाच मानवाचा स्थायीभाव

विरोध हाच विकासाचा नियम आहे, संघर्षातूनच मानवी प्रगति होत असते असा एक साम्यवादी सिद्धान्त तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत सुप्रसिद्ध

आहे. अराज्यवाद्यांचा या मताशीं संपूर्ण विरोध आहे. त्यांच्या मते समन्वय किंवा सहकार्य हेच मानवी प्रगतीचें मूळ आहे. लढाया, मारामाऱ्या, द्वेष, मत्सर इत्यादि कृत्ये मानवी झगड्याची साक्ष देत असले तरी त्याच्याहून कितीतरी पट मोठे असे सहकार्य, प्रेम, सहकारी जीवन विशेष गाजावाजा न करतां मानवी इतिहास घडवीत असते. निसर्गाशीं झगडून मानवानें आज जो मोठा विक्रम केला आहे त्याला कारण मानवातील जन्मजात सहकार्य हेंच आहे. मोठमोठ्या इमारती, कालवे, पाटबंधारे, आगगाड्या, आगबोटी इत्यादि सर्व गोष्टी प्रत्यक्ष मानवी सहकार्याची साक्ष पटवीत असतात. परस्पर सहकार्य हाच मानवाचा स्वभावधर्म आहे. 'अवघे धरूं सुपथ ' ही वृत्ति हाच त्याचा स्थायीभाव आहे. त्यामुळें शासनमुक्त समाजव्यवस्थेत संघर्ष किंवा युद्ध होणे अशक्य आहे. त्या समाजरचनेंतच माणसाला सुख, समाधान आणि शांति मिळणार आहे. माणूस पिंडाने सहकारी वृत्तीचा असल्यामुळे राज्य नष्ट झाल्यानतर सर्व व्यवहार तो परस्पराच्या सहकार्याने सुरळीत करील. शासनमुक्त समाजातच त्याच्या क्रियाशील शक्तींचा आविष्कार होईल.

## प्रादेशिक स्वयंपूर्णता

सहकार्याप्रमाणे विकेंद्रित अर्थव्यवस्थेवर अराज्यवाद्यांनीं दिलेला भर व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. त्याच्या मते महायंत्रोत्पादनाचा आश्रय केल्याने आर्थिक सत्तेचें एका ठिकाणीं केंद्रीकरण होतें. त्यामुळें अनेकांचें व्यक्तिस्वातंत्र्य धोक्यांत येतें. या दृष्टीनें त्यांनीं पुरस्कारलेली विकेंद्रित अर्थव्यवस्था अभ्यसनीय आहे. त्यांच्या मते विशाल राज्याचे निरनिराळे छोटे विभाग पाडले पाहिजेत व प्रत्येक विभाग आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण असला पाहिजे. छोट्या भूभागाची आर्थिक स्वायत्तता स्थापन झाली तर राजकीय सत्ता देखील तेथील नागरिकांच्या हातीं राहणे कठीण होणार नाहीं. आर्थिक स्वावलंबनासाठीं छोट्या प्रांतांनीं सर्व मालाचें छोट्या प्रमाणावर उत्पादन केले पाहिजे. आजच्या ग्रामोद्योगासारखे लहान लहान धंदे सर्वत्र सुरू केले पाहिजेत. परस्पर सहकार्याच्या बळावर हे सर्व धंदे

व्यवस्थित चालूं राहतीलच. परंतु त्यामुळें कोणत्याही ठिकाणीं धनसंचय होऊन इतरांच्या आर्थिक पिळवणुकीची भीति उरणार नाहीं.

शासनमुक्त समाजरचनेमध्ये या लहानलहान, स्वयपूर्ण, स्वायत्त भूभागावर अराज्यवाद्यांनीं दिलेला भर अत्यंत महत्त्वाचा आहे. क्रोपोटकीननें ही कल्पना आपल्या ग्रंथात विस्ताराने माडली आहे. तो म्हणतो, " Each commune will be an independent economic and administrative organization possessing all the means of production and consumption "

अराज्यवाद्यांची ही कल्पना आजच्या विकेंद्रित अर्थव्यवस्थेचा मूळ पाया आहे.

## अराज्यवादांतील अव्यवहार्यता

अराज्यवाद्याची शासनमुक्त समाजव्यवस्थेची कल्पना तात्त्विक दृष्ट्या कितीही विलोभनीय आणि महत्त्वपूर्ण वाटत असली तरी प्रत्यक्षांत ती कल्पना कितपत व्यवस्थित उतरूं शकेल हा विवाद्य मुद्दा आहे. राज्य नष्ट झाल्यानतर सहकार्याच्या जोरावर मानवी व्यवहार सुरळीत चालतील असा आशावाद बाळगणें म्हणजे सध्याच्या मानवी स्वभावाबद्दल अवास्तव अपेक्षा बाळगण्यासारखे आहे. समाजाची सुनियत्रित घडी विस्कटून टाकायाला अत्यत थोडे लोक देखील पुरेसे होतात. अशा अल्पसंख्य लोकांनीं समाजाची व्यवस्था नष्ट करून टाकली तर त्या वेळीं पुन्हां शांतता, सुस्थिरता प्रस्थापित करण्याचें कोणतें साधन समाजाजवळ उरते ? अशा काळांत राज्याची आवश्यकता मान्य करण्यावांचून गत्यंतरच उरत नाहीं. त्यांतून सध्यांच्या राज्याधिष्ठित समाजाकडून शासनमुक्त समाजाकडे एकदम जाण्याची त्याची कल्पना तर अव्यवहार्यच म्हटली पाहिजे. या अव्यवहार्यतेमुळें ही कल्पना फ्रान्स, इटली, स्पेनमध्यें कांहीं काळ लोकप्रिय झाली तरी नंतर तिला जगांत कोणीही पाठीराखे मिळाले नाहींत.

अराज्यवादाची कल्पना अव्यवहार्य म्हणून बाजूला टाकली तरी मानवी सहकार्यावरील भर, प्रादेशिक स्वयंपूर्णतेची कल्पना, कोणतीही सुधारणा खालून वर नेण्याचा विचार हीं त्याचीं वैशिष्ट्ये व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने अमोल आहेत. व्यक्तिविकासाचे आश्वासन अशा तऱ्हेची समाजव्यवस्थाच फक्त आजच्या मानवाला देऊं शकेल.

आतांपर्यंत राज्यशास्त्रातील दोन प्रमुख शाखांचा व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें विचार केला. या दोन्ही शाखा आजच्या मानवाला स्वातंत्र्याचे आश्वासन द्यावयाला अपुऱ्या आहेत समूहवाद्यामध्ये आपण मुख्यतः कल्पनावादी आणि साम्यवादी यांचा अंतर्भाव केला. प्लेटो किंवा हेगेल यांचा आदर्शवाद मनुष्याला विकासाऐवजी विनाशाकडे नऊन सोडतो व्यक्तीचे समाजजीवनामधील मध्यवर्ति स्थान तो हिरावून घेतो व ते काल्पनिक राष्ट्रदेवतेला अपर्ण करतो. साम्यवाद्याचा समूहवाद चोखाळला तरी मानवाची सर्जनशील शक्ति सुंदर रूप घेऊन बाहेर पडणार नाहीं कारण तेथे समूहवादाच्या मूर्तीसमोर तिचा बळी पडणार आहे. या दोन्ही मार्गांनें गेल्यास आपले ध्येय कधीच साकार होणार नाहीं मानवाच्या साऱ्या सर्जनशील शक्ति क्षितिजाच्या पलीकडे अनंतकाळ निद्रिस्तच राहतील.

उलट आत्यंतिक व्यक्तिवादाचा आश्रय केला तरी मानवाला अराज्यवादाचा शाप भोगावा लागणार आहे इपिक्यूरस स्पेन्सर, जॉन स्टुअर्ट मिल यांचा व्यक्तिवाद आजची आपली गरज भागवू शकत नाहीं. तो 'वाद' समाजाची विघटना करणारा आहे आणि विस्कळित समाजव्यवस्थेंत मनुष्य आपला व्यक्तिविकास तरी कसा करणार ? त्यासाठीं सामाजिक स्थैर्याची अत्यंत गरज आहे.

वरील दोन्ही पंथ आत्यंतिकवादी आहेत. पहिला वर्ग समष्टीचा फाजील बडेजाव माजवितो व व्यक्तिविकास खुंटवून शकतो. दुसरा सामाजिक स्थैर्य भंगून टाकतो व व्यक्तीच्या प्रगतीचा मार्ग रोखून टाकतो. प्रश्न आहे तो हा कीं समाज सुसंघटित राहिला पाहिजे आणि शिवाय व्यक्तीचे स्वातंत्र्य मर्यादित न होतां त्याच्या कर्तृत्वाला विश्वाचे अफाट अंगण मोकळे राहिलें

पाहिजे. ही समस्या सुटली तरच आपलें प्रगतीचें पाऊल पुढे पडणार आहे. मानवाचे भवितव्य या प्रश्नाच्या उत्तरावर अवलंबून आहे. आजचे थोर विचारवंत या कूट प्रश्नाला उत्तर देऊन प्रगतीचे नवे दालन उघडतील काय ? रम्य भविष्यकाळ कानांत प्राण आणून याचे उत्तर ऐकण्यासाठीं तिष्ठत उभा आहे !

---

भाग २ रा

# ४ : व्यक्तिस्वातंत्र्याची विधायक बाजू.

पहिल्या भागातील व्यक्ति–स्वातंत्र्यासंबधींची चर्चा कितीही सयुक्तिक आणि तर्कशुद्ध असली तरी ती फार समाधानकारक वाटत नाहीं. कारण ती चर्चा केवळ निषेधात्मक आहे 'समूहवाद नको,' 'फुटीर व्यक्तिवाद नको' असे फक्त नकारात्मक उत्तर वरील विवेचनानें दिले आहे. अशी विध्वंसक बाजू प्रश्नाचे होकारात्मक उत्तर देऊ शकत नाहीं. वेदामध्ये आत्म्याचें वर्णन करताना फक्त 'नेऽति नेऽति' अशा शब्दात केले आहे. तसाच काहींसा प्रकार येथेही घडलेला आहे. व्यक्तिस्वातंत्र्याची समस्या सोडविण्यास अशा निरूपणापेक्षा काहीं विधायक वा भावात्मक विवेचनाचा उपयोग होईल. या दृष्टीने होकारात्मक भाषेत याचा अभ्यास झाला तर फार बरें होईल. परतु हा मार्ग जितका आवश्यक तितकाच कठीण असतो. बर्ट्रांड रसेलसारखे विश्वकीर्तीचे विचारवत देखील या मार्गांत लवकरच दमून जातात. परंतु हा रस्ता अवघड असला तरी अटळ आहे. या दृष्टीनें कांहीं विधायक भूमिकेवरून व्यक्ति–स्वातत्र्यासबधीं कांहीं विचार मांडता आले तर तसा प्रयत्न होणे जरूर आहे.

असे विधायक विवेचन तीन तऱ्हेनें करता येईल.

**( १ ) आपली अर्थव्यवस्था :**—यामध्यें भांडवलशाही अर्थ-

व्यवस्था, समाजवादी अर्थरचना, संमिश्र अर्थव्यवस्था आणि सहकारी अर्थरचना यांचा प्रामुख्यानें अंतर्भाव करावा लागेल.

( २ ) **राजकीय पक्ष पद्धति** :— अर्थव्यवस्था आणि शिक्षण व्यवस्था याच्या इतकीच पक्ष पद्धति महत्त्वाची मानावी लागेल. या पक्षपद्धतीमध्यें कम्युनिष्ट राज्यांतील 'एकपक्षीय हुकूमशाही' व लोकशाही राज्यांतील द्विपक्ष किंवा बहुपक्ष पद्धति याचा समावेश करावा लागेल. विवेचनामध्यें लोकशाही राज्यातील पक्षपद्धतीवर अधिक भर दिला आहे. कारण साम्य-वादी राज्यातील 'एकपक्षीय हुकुमशाही' व्यक्तिस्वातंत्र्याशीं विसगत आहे हें फारशी चर्चा न करता देखील सिद्ध होण्यासारखे आहे असे प्रस्तुत लेखकाचे मत आहे. पक्षपद्धतीवरील विचार समजावून घेतल्यानंतर 'पक्षपद्धति नष्ट करा' असा जो नवा विचार या क्षेत्रात आला आहे त्याचा विचार होणें जरूर आहे

( ३ ) **शिक्षणाचे तत्त्वज्ञान** :— समाजव्यवस्थेला अनुसरूनच शिक्षणाचे तत्त्वज्ञान ठरविले जातें. या दृष्टीनें कामगाराच्या हुकूमशाही राज्यातील शिक्षणाचे तत्त्वज्ञान, भांडवलशाहीप्रधान लोकशाही राज्यातील शिक्षणाचें तत्त्वज्ञान व सहकारी समाजव्यवस्थेला अनुरूप अशा राज्यांतील शिक्षणाची निष्ठा याचा अभ्यास करणें जरूर आहे.

## व्यक्तिस्वातंत्र्य आणि अर्थव्यवस्था

भांडवलशाही समाजव्यवस्थेमधील अर्थव्यवस्था व्यक्तिविकासाशीं विसंवादी आहे. त्या अर्थव्यवस्थेमध्यें कांहीं थोड्या धनपतींचा विकास हा बहुसंख्य लोकांच्या विनाशावर उभारलेला असतो. तेथें भांडवलदारांचें स्वातंत्र्य ही इतरांची आर्थिक गुलामगिरी ठरत असते. कारण या भांड-वलशाही अर्थव्यवस्थेचे अंगभूत गुण प्रामुख्यानें तीन असतात.

( १ ) अनियंत्रित खुली स्पर्धा.

( २ ) उत्पादनाच्या साधनांची खाजगी मालकी.

( ३ ) नफा ही सर्व आर्थिक व्यवहारांची मूळ प्रेरणा.

वरील तिन्ही गुणामुळे समाजांतील संपत्तीचें मोठें केंद्रीकरण अल्पसंख्य धनपतींच्या हातांत होतें. अमर्याद मुक्त स्पर्धा हा समाजांतील अर्थव्यवस्थेचा पाया असतो. या स्पर्धेत जो टिकेल तो जगेल, बाकीचे नष्ट होतील हा सर्वमान्य सिद्धान्त असतो. त्यामुळे जीवनकलहात इतरासंबंधीं कसलाहि सारासार विचार न करतां आपल्या पैशाच्या राशीकडे लक्ष ठेवून सर्व व्यवहार करावयाचे असतात. या मुक्त स्पर्धेला उत्पादनाच्या साधनाच्या खासगी मालकी हक्काचे पाठबळ मिळाल्यामुळे समाजात अधिकच तीव्र चुरस सुरू होते. गिरण्या, कारखाने, बॅंका, खाणी इत्यादि सपत्तीच्या उत्पादनाचीं साधनें काहीं अल्पसंख्य भाडवदाराच्या ताब्यात असल्यामुळे त्याच्या जोरावर ते बहुसख्य कामगाराचे आर्थिक शोषण करू शकतात. मजुराजवळ त्याच्या श्रमाशिवाय सपत्तीचे दुसरे साधन नसते. त्यामुळे भाडवलदार विरुद्ध कामगार या लढाईत दुसरा पक्ष पूर्णपणें निःशस्त्र आणि निराधार असतो. भांडवलदारवर्ग बॅंका, कारखाने इत्यादींच्या खाजगी मालकीमुळें मजुराना तासनूतास राबवून त्याच्या श्रमाचे शोषण करूं शकतो. खुली स्पर्धा आणि सपत्तीच्या उत्पादनसाधनावरील खाजगी मालकी हक्काबरोबरच अमर्याद नफ्याची बैठक मिळाल्यामुळे वरील सामाजिक अनिष्टाला आणखी धार प्राप्त होते. या अर्थव्यवस्थेत नफा हाच भाडवलदारांचा परमेश्वर असतो. जास्तींत जास्त नफा हेच त्याचें साध्य बनलेलें असते. यासाठीं ते वाटेल त्या भल्याबुऱ्या साधनाचा वापर करू शकतात. कारण तेथें बोलून चालून खुली स्पर्धा असते आणि या स्पर्धेला हातांतील आर्थिक सत्तेचे बळ असते. वरील तिन्ही अरिष्टें एकत्र आल्यानें बहुसख्य समाजावर फार वाईट परिणाम होतो याचें प्रत्यतर एकोणिसाव्या शतकांतील औद्योगिक क्रातीनंतर युरोपात सर्वांना फार तीव्रतेनें आलें. तेथें आर्थिक स्वातंत्र्याच्या जोरावर थोड्या धनपतींनीं लाखो मजुराची आर्थिक स्थिति फारच केविलवाणी करून टाकली. त्यांचें आर्थिक जीवन पराकाष्ठेचें असह्य केलें. त्यांनीं दहा दहा वर्षांच्या बालकांना गिरण्याच्या यंत्राशीं बारा बारा तास राबावयाला लावले. इतरांना देखील दिवसांतील बारा चौदा तास काम आणि प्राण कसेबसें कुडींत ठेवूं शकेल एवढाच पगार. या

परिस्थितीचें भेदक वर्णन सर स्पेन्सर वॉलपोल यांनीं आपल्या History of England या ग्रंथांत केलें आहे. ते म्हणतात, "The parent who would endeavour to realise the life of a factory child in 1832 should try to imagine his own little boy or girl—eight or nine years of age—working in factory. He should try to recollect that it would be his duty to rouse the child on a cold winter's morning at five that it might be at its work at six, that, day after day, week after week, month after month, it would be forced to rise at the same hour, that with two short intervals at half an hour each, it would be kept to its dull employment for thirteen hours every day, that during the whole of that time it would be breathing a dusty, unwholesome atmosphere, rarely able to relieve its limbs by sitting down." ( History of England, Vol. III, P. 201 by Sir Spencer Walpole ).

( इ. स. १८३२ मध्ये कारखान्यांत काम करणाऱ्या बालकांची स्थिति काय होती हें समजावून घ्यावयाचे असेल तर पालकांनीं घटकाभर आपलाच आठ वर्षांचा मुलगा तेथे कामाला आहे असें गृहीत धरावे. या लहान मुलाला हिवाळ्यातील थडीच्या दिवसात पहांटे पाच वाजता कामासाठीं उठवावयाचें आणि सकाळी सहाला त्याला कामाला जुंपावयाचें. हाच दिनक्रम दिवसामागून दिवस, आठवड्यामागून आठवडे, महिन्यामागून महिने असा चालू असे. दिवसातून या बालकाला तेरा तास काम करावें लागे. मध्यंतरी अर्ध्या तासाच्या दोन थोड्या सुट्टया मिळत तेवढ्याच ! आणि एवढे सगळें काम कसल्या वातावरणात करावयाचे तर जेथें श्वासोच्छ्वासाला घाणेरडी, रोगट अशी हवा आहे तेथें. अशा ठिकाणीं खालीं बसून आपली गात्रे ताजीतवानी करणे देखील मोठे मुष्किल असते )

अशा अर्थव्यवस्थेंत बालकाची ही स्थिति, तर मग इतर स्त्री-पुरुषाचे हाल विचारावयाला नकोत ! अशा दैनंदिन कार्यक्रमांत व्यक्तिस्वातंत्र्य हा

भलामोठा शब्द उच्चारणें देखील हास्यास्पद ठरेल. अशा अर्थव्यवस्थेंत सामान्य नागरिकाला आर्थिक स्वातंत्र्यच नाकारलेलें असते त्यामुळें त्याच्या जीवनातील राजकीय आणि सामाजिक स्वातंत्र्य देखील पुष्कळ प्रमाणात नष्ट झालेले असतें. अल्पसंख्याकांना आर्थिक स्वातंत्र्य देऊन बहुसंख्याकाना त्याच्या आर्थिक गुलामगिरींतून डाबून ठेवणारी भाडवलशाही अर्थव्यवस्था मानवाला स्वातंत्र्याचे अभयदान कदापिही देऊं शकणार नाहीं हें सूर्य-प्रकाशाइतकें स्वच्छ आहे.

या भाडवलशाही राज्याप्रमाणे साम्यवादी अर्थव्यवस्थेत देखील व्यक्ति-स्वातंत्र्य तगू शकत नाहीं हेंही उघड आहे. त्याची चर्चा यापूर्वीच आल्यानें त्याची पुनरुक्ति करण्याची गरज नाहीं.

वरील अर्थव्यवस्थेंतून तडजोड म्हणून नवी मिश्र अर्थव्यवस्था उदयाला आली आहे. या नव्या मिश्र अर्थव्यवस्थेमध्यें ( Mixed economy ) व्यक्तिस्वातंत्र्याचे आश्वासन कितपत पाळले जातें हे अभ्यसनीय आहे.

### मिश्र–अर्थव्यवस्थेची 'सफलता' (!)

मिश्र अर्थव्यवस्था म्हणजे भाडवलशाही अर्थव्यवस्था आणि साम्यवादी अर्थरचना याचा झालेला मिश्रविवाह आहे ! या नव्या अर्थव्यवस्थेमध्ये भांडवलशाही अर्थव्यवस्थेप्रमाणे कांहीं धंद्याची खाजगी मालकी ठेवलेली असते व साम्यवादी अर्थरचनेंतील कांहीं धंद्याचे राष्ट्रीयीकरण करण्याचे तत्त्व घेतलेले असते. मोठमोठे कारखाने, गिरण्या, बँका, खाणी यांचा ताबा खाजगी व्यक्तीकडेच असतो व इतर कांहीं धंद्याचे राष्ट्रीयीकरण सरकारनें केलेले असते. या पद्धतीमुळे भाडवलदाराना नफ्याची प्रेरणा (Incentive) देऊन कांही उद्योगधंदे चालविण्यास उत्तेजन दिलेलें असतें कारण भांडवलाच्या अभावी सरकार सर्व धंदे ताब्यांत घेऊ शकत नाही. देशाचें उत्पादन चालू राहावें व शक्य झाल्यास वाढावें म्हणून ' खाजगी मालकी ' सुरक्षित ठेवलेली आहे. उलट सरकारास जेथे शक्य आहे व खाजगी भाडवलाची जेथे आवश्यकता नाहीं ते धंदे राष्ट्राच्या ताब्यात घेतलेले

आहेत. यामुळें मिश्र अर्थव्यवस्थेत दोन्ही अर्थव्यवस्थेतील चागले भाग एकत्रित झाले आहेत असें कांहीं प्रवक्त्याचे मत आहे.

दुर्दैवाने त्याची ही श्रद्धा खोटी ठरण्याची शक्यता जास्त आहे. कारण भांडवलदारांकडे जे खाजगी धदे सोपविले जाणार ते सर्व नफ्याचे असणार. जेथे नुकसानीचा धोका आहे असे उद्योग खाजगी भाडवलदार स्वतःच्या ताब्यात घेणार नाहींत उलट, जेथे नुकसानीचा सभव जास्त आहे व उत्पादनक्षमता कमी आहे असे उद्योगधंदे सरकारकडे येणार! आणि सरकार नुकसानीचा खड्डा भरून काढण्यासाठी जनतेवर जास्त कर लादणार ! त्यावांचून हे नवे राष्ट्रीयीकरण यशस्वी कसे होणार ? म्हणजे नफ्याची बाजू भाडवलदाराकडे व तोट्याचे धदे सरकारकडे अशी सुंदर(!) वाटणी होणार ! यामुळे खाजगी भाडवलामुळे नफ्याच्या रूपाने जनतेचा पैसा भांडवलदाराकडे जाणार आणि शिवाय नव्या कराच्या रूपाने जादा पैसा सरकारकडे जाणार ! एकदरींत जनतेच्या वाट्याला दोघाचा सासुरवास सुरू होणार ! यालाच या अर्थव्यवस्थेचे प्रवक्ते 'सुवर्ण–मध्य' म्हणत असतील तर मग 'सुवर्ण' याचा अर्थ बदलला पाहिजे

उत्पादनाच्या दृष्टीनें हा जसा व्यक्तीवर आर्थिक दृष्ट्या अनिष्ट परिणाम होईल तसाच तो विभाजनाच्या दृष्टीने घातक होईल सपत्तीची योग्य विभागणी या मिश्र अर्थव्यवस्थेमध्ये होईल का ? धनपतींकडे जास्त जास्त गोळा होणारा पैसा पुन्हा बाजारांत येईल का ? नव्या धद्याचे उद्घाटन त करतील कां? शिवाय सरकारी पैसा संधिकालांत जनतेला आर्थिक स्थैर्य कोठून देणार? यामुळे विभाजनाच्या दृष्टीने निराशाच होणार आहे. शिवाय कोणतीही अर्थव्यवस्था ही जीवननिष्ठेचे प्रतीक असतें. किंबहुना जीवनाच्या विशिष्ट तत्त्वज्ञानाची ती पडछाया असते. साम्यवादी अर्थव्यवस्थेमागें बरोबर असो चुकीचे असो निश्चित तत्त्वज्ञान आहे. तीच गोष्ट भाडवलशाही अर्थव्यवस्थेची ! परंतु या मिश्रअर्थव्यवस्थेमागे कोणते जीवनविषयक तत्त्वज्ञान आहे ? तेथे केवळ तत्त्वज्ञानाची पोकळी दिसत नाहीं काय ? अशी अर्थव्यवस्था (येथे व्यवस्था हा शब्द देखील फार सैल अर्थाने वापरला आहे) आपले प्रश्न सोडविण्यास अपुरी न पडली तरच आश्चर्य !

साम्यवादी अर्थव्यवस्था, भांडवलशाही अर्थव्यवस्था आणि या दोन्हींच्या संयोगांतून तयार झालेली मिश्र अर्थरचना जर आपणांस स्वातंत्र्याचें आश्वासन देत नाहीं तर मग कोणती अर्थव्यवस्था आपली इच्छा साकार करील ?

## नवी सहकारी अर्थव्यवस्था

सहकारी अर्थव्यवस्था म्हणजे नामवंत विचारवंतांच्या अनेक वर्षांच्या विचार-मंथनाचे फळ आहे व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांना नवें आशास्थान म्हणजे हीच अर्थव्यवस्था होय ! परंतु सहकारी अर्थव्यवस्था म्हटली कीं, आपल्या डोळ्यांसमोर नेहमींच्या भांडवलशाही अर्थव्यवस्थेतील सहकारी सोसायट्या येण्याचा संभव आहे. ही नवीन सहकारी अर्थव्यवस्था भांडवलशाहींतील सहकारी सोसायटीहून जशी आमूलाग्र भिन्न आहे तशी साम्यवादी राष्ट्रांतील सहकारी चळवळीहून मूलतः निराळी आहे. त्यांच्यात फरक तपशीलाचा नसून तत्त्वाचा आहे. या तिन्ही सहकारी चळवळीपाठीमागील जीवन-प्रेरणा निराळी आहे.

भांडवलशाही अर्थरचनेतील सहकारी सोसायट्या म्हणजे त्या त्या सामाजिक व्यवस्थेची केवळ डागडुजी आहे. या अर्थरचनेमुळे गरीब आणि श्रीमंत यातील भेद पराकोटीला जाऊ लागतो. कारण स्पर्धा हे त्यापाठीमागील जीवनाचे तत्त्वज्ञान आहे. या स्पर्धाप्रधान तत्त्वज्ञानामुळें गरीब अधिक गरीब होऊ लागले. कारण आर्थिक दृष्ट्या ते दुबळे असतात. गरिबांच्या दारिद्र्याबरोबर त्यांचे हाल असह्य होऊ लागले. त्यांच्यातील असंतोष वाढू लागला. गंधकाच्या कोठारासारखा जनतेचा असंतोष कधीं पेट घेईल याची खात्री नसते. त्यामुळे त्यांचे दुःख कमी करणे जरूर असतें. या व्यवस्थेमधील सहकारी सोसायट्या म्हणजे या जखमेवर केलेला मामुली इलाज होय. परंतु त्यामुळें दुःखाचे मूळ नष्ट होणार नाहीं. या सहकारी सोसायट्यांचें तें उद्दिष्ट नाहीं. त्यांचे तें कार्यही नाहीं.

साम्यवादी देशांत कांहीं सहकारी सोसायट्या असतात. परंतु त्यांचें ध्येय व धोरण मूलतः निराळें आहे. तेथें जीवनातील सर्व व्यापार सरकारने व्यापलेल

असतात. फारच थोडे व्यवहार असे असतात कीं जेथें सरकारी यंत्रणेचा बळकट हात जाऊन पोहोचण्याची गरज नसते. तेथील समाजजीवनातील कांहीं क्षेत्रे अशीं असतात कीं सरकारने तेथील जनतेला तीं उदार अंतः-करणाने मोकळीं सोडलीं तरी मध्यवर्ति सरकारच्या सर्वंकष सत्तेला बाध येत नाही. अशा शिल्लक असलेल्या भागात साम्यवादी देशांतील सहकारी चळवळी चालू असतात. त्या पाठीमागील जीवननिष्ठा समूहवादीच असते. सरकारी हालचालीचा भाग म्हणजेच या साम्यावदी सहकारी चळवळी असतात. राष्ट्राच्या आयुष्यात त्याचे महत्त्व थोडे आणि उपेक्षणीय असतें.

उलट या नव्या सहकारी अर्थव्यवस्थेतील सोसायटया या वरील दोन्ही सोसायटयांहून सर्वस्वी निराळ्या राहतील. सहकार्य ही तिची जीवननिष्ठा राहील. स्पर्धा वा समूहवाद या तत्त्वज्ञानापासून सहकार्यांचे तत्त्वज्ञान आमू-लाग्र भिन्न आहे. सहकार्य हा या समाजव्यवस्थेचा पाया राहील. सहकारी वृत्ति ही केंद्रस्थानी असेल व समाजाचे सर्व व्यवहार याच एका तत्त्वा-प्रमाणे घडतील त्यामुळे ही सहकारी सोसायटी उद्दिष्ट, स्वरूप यामध्ये संपूर्णपणे नवी असेल.

## सहकारी अर्थव्यवस्थेमागील तत्त्वज्ञान

या सहकारी अर्थव्यवस्थेचा विचार करण्यापूर्वी ती ज्या गृहीतकृत्यावर आधारलेली आहे तिचा अभ्यास होणे जरूर आहे. माणूस पिंडानें सहकारवादी आहे. (Man is essentially a Cooperative being–M. N Roy) हा या चळवळीचा पाया आहे. त्याच्या मते सहकार्य ही माणसाची प्रकृति आहे. स्पर्धा ही त्याची विकृति आहे. मानवाचा गेल्या चारपाच हजार वर्षांचा इतिहास हा सहकारी प्रवृत्तींचा इतिहास आहे. सहकारवाद्यांचें हे महत्त्वाचें गृहीतकृत्य आहे. या विधानाची सत्यता पटविण्यासाठीं इतिहासाची मदत घेतली तर मोठा बाका प्रसंग गुदरतो. कारण त्याची साक्ष उलटसुलट दोन्ही बाजूनें मिळते. माणूस हा आक्रमणशील आहे. डार्विनने तर स्पर्धेवर आपले सारे विचार आधारले होते. त्यामुळें माणसाच्या जन्मजात सहकारी प्रवृत्ती-बद्दल शंका वाटते. परतु याचें उत्तर समाजचौकटीवर देखील अवलंबून

आहे. माणसाला ज्या तऱ्हेचें सामाजिक वातावरण अनुकूल असेल त्या तऱ्हेचे धोरण तो ठरवितो. त्यामुळें या विधानाच्या सत्यासत्यतेपेक्षा समाज-घडीचा अधिक विचार झाला पाहिजे. समाजाची ठेवणच अशी असली पाहिजे कीं तेथे माणसाच्या सहकारी वृत्तीला हटकून बहर येईल. अशी समाजरचना निर्माण करणे हे नजीकच्या काळातील आपलें ध्येय आहे.

## सहकारी संघ

या सहकारी समाजव्यवस्थेचा कणा म्हणजे देशभर पसरलेले ' सहकारी संघ ' ( Cooperative Units) होत जागजागीं असें ' संघ ' निर्माण होऊन सर्व व्यवहार या संघामार्फत झाले पाहिजेत. ते जसे जनतेकडून निर्माण होतील तसेच जनतेकडून चालविले जातील. हे संघ म्हणजे लोकांच्या स्वयस्फूर्त सहकार्याचें प्रतीक राहतील. या सहकारी संघाच्या कार्यासंबधीं आपणास असें खूप सागता येईल. परतु त्याचे प्रत्यक्ष स्वरूप कसें राहील ? या संघाचा विस्तार केवढा असेल ? किती मैलाचा टापू या एका ' सहकारी सघा'मध्ये सामील झालेला असेल ? जास्तींत जास्त किती लोकसख्या त्याच्या वर्तुळामध्ये येईल ? हे सारे प्रश्न अनिर्णित राह-तात. याचें उत्तर कांटेकोरपणे देता येणे आज अशक्य आहे. मैलामध्यें किंवा फर्लांगामध्ये जमिनीचा भाग सागता येणार नाहीं. गणिताच्या भाषेत त्यातील लोकांचें वर्णन करता येणार नाहीं. परंतु ढोबळमानाने याबाबत नियम सागता येईल तो असा कीं ' सहकारी सघाचा ' भूभाग इतका लहान असावा कीं त्यात प्रत्येक नागरिकाला पूर्णपणे भाग घेता यावा आणि तो इतका मोठा असावा कीं त्यामुळे आधुनिक यत्राचा फायदा घेता यावा. ही सीमारेषा मारणे हे फार कौशल्याचें काम आहे. कारण सहकारी संघ लहान ठेवला तर शेतीचे मोठ्या प्रमाणावरील उत्पादन, वीजेचा पुरवठा वा यासारख्या तत्रविद्येचा उपयोग करून घेणें अशक्य होईल. उलट अशा यत्राचा फायदा घ्यावयाचा म्हटले तरी सघ-विस्तार खूप मोठा होईल. त्यामुळे उत्पादन-क्षमता आणि कार्यक्षमता निश्चित वाढेल. परतु मग त्याचें क्षेत्र इतके वाढेल कीं तें सामान्य माणसाच्या आटोक्याच्या बाहेरचें राहील.

त्यामध्यें व्यक्तींचे सार्वभौमत्व गडप होऊन जाईल. ही शृंगापत्ति कशी चुकवावयाची हा प्रश्न आहे. परतु स्थूलमानानें हेच तत्त्व सहकारी 'सघा'च्या निर्मितीमागे असेल. तिचे जास्तींत जास्त कसोशीनें पालन झालें पाहिजे.

## सहकारी अर्थव्यवस्थेचे मूलभूत सिद्धान्त

या सहकारी जीवनाचा एक महत्त्वाचा सिद्धान्त वर सागितला. परंतु याशिवाय आणखी कांहीं मूलभूत तत्त्वे सांगितलीं पाहिजेत. त्या दिशेने सघाने आपलीं पावले टाकावींत. त्यापैकीं काहीं नियम साररूपानें सागता येतील ते असे :

( १ ) देशामध्यें एक मध्यवर्ति नियोजनसमिति असेल. ( Central Planning Commis ion ) ही समिति देशाचें उत्पादन आणि विभाजन यांसंबंधीं मार्गदर्शन करील. नियोजन हे आधुनिक राष्ट्राचे अगभूत लक्षण बनले आहे. अर्थात हे नियोजन भाडवलशाही राष्ट्रात असतें. त्याचप्रमाणें साम्यवादी देशातही असते. परंतु या नियोजनामुळें दोन्ही देशात व्यक्ति-विकास मुक्तपणाने होत नाहीं. साम्यवादी देशात तर सत्ताकेंद्रीकरणामुळे व्यक्तिस्वातत्र्य अर्धांगवायु झाल्यासारखे लुळे होऊन पडते. भांडवलशाही राष्ट्रांतील नियोजन भाडवलशाहीला जीवदान देण्यासाठीं असते. त्याना सामान्य लोकावरील आपली आर्थिक पकड ढिली होऊं द्यावयाची नसते. त्यामुळे तेथील नियोजन देखील व्यक्ति विकासाला पोषक ठरत नाहीं. सहकारी जीवनांतील नियोजनाचे कार्य वरील दोन्हीहूनही भिन्न राहील. येथें देशांतील सर्व सहकारी सघ उत्पादन, विभाजन यासंबंधीं सर्व निर्णय स्वतःच घेतील परंतु एका सहकारी सघाला इतर सहकारी संघाच्या गरजा वा अडचणी समजणे शक्य नसते. उत्तरे-कडे धान्याचा तुटवडा असला आणि दक्षिणेकडे कापडाची दुर्मिळता असली तर मध्यवर्ति समितीला याची जाणीव असली पाहिजे. आपलें उत्पादनाचें धोरण तो त्याप्रमाणे ठरवूं शकेल. यासाठीं मध्यवर्ति नियोजन समितीनें देशांतील सर्व सहकारी केंद्रांची पूर्ण माहिती गोळा केली पाहिजे. देशाची तात्कालिक निकड कोणती, अद्याप कोठें किती उत्पादनशक्ति सुप्त

आहे ही माहिती या समितीला असली पाहिजे. त्यानुसार ही मध्यवर्ति समिती इतर केंद्रांना माहिती पुरवील व त्यांना कांहीं विनंतीवजा सूचना करील. परंतु या मध्यवर्ति समितीची मुख्य भूमिका मित्र, मार्गदर्शक आणि तत्त्वज्ञ ( Friend, Guide and Philosopher ) हीच राहील, तींच नातीं सर्व केंद्रांशीं ठेवलीं जातील.

( २ ) या सहकारी अर्थव्यवस्थेचें यश मोजण्याचे एकच एक गमक म्हणजे प्रत्येक व्यक्तीचे सुखी जीवन !'सहकारी संघां'तील व देशातील प्रत्येक इसम आर्थिक-स्वातंत्र्य भोगत असला पाहिजे. त्याला देशाच्या भरभराटीचीं फळे चाखावयास मिळालीं पाहिजेत. व्यक्तीच्या विकासाऐवजीं " देशाचें वैभव " ' संघाचें कल्याण ' असल्या फसव्या समूहवादी घोषणा उपयोगाच्या नाहींत. शभर लोकांमध्ये प्रत्येकजण विपन्नावस्थेत आहे. परंतु सर्वांचा संघ मात्र ऐश्वर्यसंपन्न आहे ही भाषा घातकी आणि आत्मवंचक आहे. असल्या समूहवादी विचारापासून अर्थरचना अलिप्त असली पाहिजे. व्यक्ति हाच तिच्या वैभवाचा मानदंड राहिला पाहिजे.

(३) सहकारी अर्थव्यवस्थेला सुरुवात जरी सहकारी शेतीनें वा एखाद्या सहकारी केंद्रानें होणारी असली तरी हें सहकार्याचे तत्त्व हळूहळूं साऱ्या जीवनभर व्यापले गेलें पाहिजे. समाजाचा प्रत्येक व्यवहार अशा ' संघा '-कडून झाला पाहिजे. या समाजांत उत्पादक, विक्रेता वा गिऱ्हाईक, मालक, मजूर असलीं कृत्रिम नातीं नष्ट झालीं पाहिजेत. या सर्व भूमिका एकसमयावच्छेदेंकरून सहकारी संघामार्फत पार पडल्या पाहिजेत. यामध्यें विसंगति वा विरोधाभास वाटण्याचें कोणासच कारण नाहीं.

(४) ' स्वयंस्फूर्त हालचाली ' हें या सहकारी संघाचें मुख्य सूत्र राहील. आपल्या छोट्याशा केंद्रांत त्याना जर कांहीं बदल हवा असेल तर तो त्यांनीं जरूर करावा. त्यासाठीं त्यानी 'वरून' आदेश येण्याची वाट पहाण्याचे कारण नाहीं. मध्यवर्ति सरकार आणि हीं केंद्रे यांचीं नातीं मालक आणि नोकर यांच्या स्वरूपाची राहणार नाहींत. तर तीं दोन समानधर्मी मित्रांची वा हितचिंतकांची राहतील. कुठल्याही नव्या धोरणाला सुरुवात स्वतः-

पासून असल्यामुळें प्रत्येकाला त्यासाठीं विचार केला पाहिजे. अशा संवयी निर्माण होणें लोकशाहीला अत्यंत आवश्यक आहे. याच एका पद्धतीमुळें लोक अहर्निश जागरूक राहतील. त्यांचा आपल्या कर्तृत्वावरील विश्वास दुणावेल व आत्मविश्वासाला नवे तेज प्राप्त होईल. ग्रीक शहरात पूर्वी जी 'प्रत्यक्ष लोकशाही' होती त्याच स्वरूपाची ही रचना राहील. या सहकारी संघाच्या कार्यामुळेच केवळ व्यक्ति–स्वातत्र्य किंवा लोकशाही आटोक्यात येईल याला दुसरा जवळचा मार्ग नाहीं.

(५) या सहकारी अर्थव्यवस्थेची प्रेरकशक्ति ( incentive ) कोणती ? हा प्रश्न अत्यत महत्त्वाचा आहे. भांडवलशाही समाजरचनेत नफा हीच उद्योगपतीची कार्यकारी शक्ति असते. परतु ही शक्ति हानिकारक असली तरी भरपूर प्रबल असते. सर्व व्यवहार त्यामुळें वेगानें चालू असतात. साम्यवादी राज्यांत 'समूहवादाची कल्पना' हें कार्य करते. तेथे ' समाजाचे कल्याण ' ही अमूर्त, अदृश्य कल्पना त्यांच्या जीवनात स्फूर्तिदात्री असते. या ' काल्पनिक वैभवाचे ' ते उपासक असतात राष्ट्र या खोट्या देवतेची ते मानसपूजा करतात. ही भावपूजा अतीं अनिष्ट असली तरी ती जबरदस्त प्रेरक शक्ति आहे यातही शंका नाहीं. परंतु या सहकारी समाजात खाजगी नफा वा सर्व समाजाचे कल्याण या कल्पना अस्तित्वांतच राहणार नाहींत. मग येथे कार्यप्रवृत्त करणारी शक्ति कोणती ? या प्रश्नाचे उत्तर व्यक्तीचे मानसशास्त्र व समाजशास्त्र विचारात घेऊन दिलें पाहिजे. ' माझ्या व्यक्ति-मत्त्वाचा विकास ' हींच ती स्फूर्तिदात्री शक्ति होय. इतर समाजव्यवस्थेत माझ्या अतरीच्या शक्तींचा फुलोरा फुलू शकत नाहीं. त्याना फक्त येथेंच बहर येतो. त्यामुळे मी प्रामाणिकपणें राबले पाहिजे ही कल्पना त्याच्या मनात दृढ झाली पाहिजे. त्यासाठीं प्रथम स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाची जाणीव सर्वांना झाली पाहिजे. ही तीव्र इच्छा निर्माण होणें सोपे नाहीं. त्यासाठीं व्यक्तीचा सांस्कृतिक विकास झाला पाहिजे. तो शिक्षणानें होऊ शकेल. नागरिक सुशिक्षित झाले म्हणजे या गोष्टी कठीण नाहींत. ही पूर्व–अट मात्र त्यासाठीं पूर्ण झाली पाहिजे.

## सहकारी अर्थव्यवस्थेंतील कांही अनिर्णित प्रश्न

सहकारी अर्थव्यवस्थेचा एवढा प्रपच केला. तरी अद्यापही कांहीं कोऱ्या जागा भरावयाच्या शिल्लक रहातात. वरील विस्ताराला त्यामुळे मर्यादा आहेत हें विसरून चालत नाहीं. कांहीं प्रश्न या नव्या रचनेत अनिर्णित राहतात. त्यांपैकीं कांहींचा उल्लेख करतां येईल.

(१) या सहकारी तत्त्वाप्रमाणे शेती वा लहान धदे चालविता येतील. परंतु प्रचंड उद्योगधंदे नियत्रित करणें शक्य होईल ? बॅंका, खाणी याची मालकी सहकारी तत्त्वाप्रमाणें कोणाकडे देतां येईल ? मोठमोठे कारखाने, कापडाच्या अवाढव्य गिरण्या या सहकारी सघाकडून चालविणे केवळ अशक्य नाहीं का ? ते शक्य करावयाचें ठरविले तरी त्यासाठीं एवढे भाडवल कुठून उभारावयाचे ? यासाठीं सहकारी सस्थाची (Public Corporation) योजना आंखली तरी तेथे भाडवलाचा प्रश्न कसा सुटेल ? त्यासाठीं राष्ट्रीयी-करणाचा आश्रय घ्यावयाचा तर मग या अर्थव्यवस्थेच्या मूलभूत तत्त्वाशीं ते विसगत होणार नाहीं का ? त्याचें उत्तर या तत्त्वाप्रमाणें कोणते असेल ?

( २ ) देशातील विविध सहकारी केंद्रे व मध्यवर्ति सरकार याचे संबध मित्रत्वाचे असावेत हे ठीक आहे परतु दोघामध्ये संघर्ष निर्माण झाला तर ? त्यावेळीं अधिक प्रभावी आवाज कोणाचा असावा ? राष्ट्र आणि सहकारी संघ याचप्रमाणे दोन सहकारी सघ याच्यातील नातीं कशी असावींत ? त्याच्यात असहकार आडवा आला तर राष्ट्राचे अधिकार कोठपर्यंत उपयोगी पडतील ? या सघटनेंतून एखाद्या सहकारी सघाला फुटून निघण्याचे स्वातंत्र्य राहील कां ?

( ३ ) वस्तूंच्या किंमती ठरविण्यासाठीं कोणत्या तत्त्वाचा अवलंब केला जाईल ? भांडवलशाहीला राष्ट्रात मागणी आणि पुरवठा या न्यायानें किमती नियंत्रित केल्या जातात. साम्यवादी अर्थव्यवस्थेंत मध्यवर्ति नियोजन समिति हे सर्व निर्णय घेते. सहकारी अर्थव्यवस्थेत किंमती ठरविण्याची पद्धति ( Price Mechanism ) कोणती राहील ?

( ४ ) ‘सहकारी केंद्राचे’ कार्यक्षेत्र ठरविण्याचें तत्त्व जरी सांगितलें तरी व्यवहारात किती मैल, खेडीं वा लोकसंख्येचा टापू एका सहकारी गटात सामील करूं द्यावयाचा ?

हीं किंवा यासारखीं आणखी काहीं प्रश्नचिन्हें या व्यवस्थेत न सुटलेलीं आहेत. परंतु याचा अर्थ असा न हे कीं तीं अनतापर्यंत सुटणार नाहींत. ही योजना अद्याप गर्भावस्थेत आहे. तिच्यांतील अपुरेपणाची जाणीव तीव्र आहे याचाच अर्थ तो अपुरेपणा नष्ट होणारा असा आहे. हे तत्त्वज्ञान अजून समृद्ध झाले पाहिजे. यथावकाश या उणिवा दूर होतील असा आशावाद खास अवास्तव ठरणार नाहीं.

## व्यक्तिस्वातंत्र्य आणि पक्ष राजकारण

पक्षपद्धति प्रातिनिधिक लोकशाहीमध्यें अत्यत आवश्यक मानली जाते. मतदाराना राजकीय शिक्षण देण्याचे व नवे विचार समाजांत फैलावण्याचें एक प्रमुख साधन म्हणून राजकीय पक्षाकडे पाहिलें जाते. आजच्या समाजात पक्षपद्धतीवाचून व्यक्तिविकास ही गोष्ट जवळजवळ अशक्य वाटते परंतु राजकीय पक्षामुळे व्यक्तिस्वातत्र्याला खरोखर मदत होते कां ? हा प्रश्न आज काहीं विचारवंतांना शंकाकुलें करीत आहे. या दृष्टीने राजकीय पक्षाचा अधिक सखोल अभ्यास झाला पाहिजे.

## पक्षपद्धतीचा उगम

आधुनिक राजकीय पक्षांचा जन्म सतराव्या शतकांत इंग्लंडमध्ये झाला. राजा आणि प्रजा यांच्या अधिकारक्षेत्राचा संघर्ष त्यावेळीं उत्पन्न झाला होता. राजसत्तेच्या पुरस्कर्त्यांना त्यावेळीं कॅव्हेलिअर्स म्हणत व प्रजेच्या पुरस्कर्त्यांना राऊंडहेड्स म्हणून संबोधीत. याच पक्षाचीं नावें पुढें टोरी आणि व्हिग अशीं पडलीं. बदलल्या परिस्थितीनुसार टोरी पक्षाचे रूपांतर हुजूर पक्षांत झालें व व्हिग गटाची उत्क्रान्ति उदारमतवादी पक्षांत झाली. इंग्लंडच्या या पक्षपद्धतीचें अनुकरण पुढें इतर देशांतही करण्यांत आलें व तें आज पुष्कळ राज्यांचें अभिन्न अंग होऊन बसलें.

राजकीय पक्षांचा उदय इंग्लंडमध्ये राजाविरुद्ध प्रजा यांच्या संघर्षात झालेला असला तरी त्याला खरा प्रारंभ युरोपांतील औद्योगिक क्रांतीनंतरच झालेला आहे. औद्योगिक क्रांतीमुळें इंग्लंडप्रमाणें युरोपमध्यें उत्पन्नाचीं साधनें आमूलाग्र बदललीं. पूर्वींचीं खेड्यांतील जीवित साधनें इतिहासजमा झालीं. कारखाने, गिरण्या यांची नवीं केंद्रें राज्यांत सुरु झालीं. औद्योगीकरण झपाट्यानें वाढल्यामुळें नवीं शहरे वसून तेथें मजुरांची संख्या द्रुत गतीनें वाढूं लागली. खेड्यांतील धंदे मोडकळीला आल्यामुळें तेथील बेकार कारागीर व कामगार शहराकडे येऊं लागले. राज्यामध्यें शहरांची संख्या झपाट्यानें वाढूं लागली व खेडीं ओस पडूं लागलीं. ज्या नव्या बदलामुळे हजारो मजूर एकत्र आले व त्यांना मतदानाचा अधिकार मिळाला. मतदारांची संख्या मोठ्या संख्येनें वाढली.

## मतदारसंघ मोठ्या प्रमाणावर विस्तारले

मतदारांची सख्या लाखोंनीं वाढल्यामुळें त्यांना भेटणें उमेदवारांना मुष्किल होऊं लागले. पूर्वी मतदारांची संख्या कमी, मतदारसंघ लहान, त्यामुळें उमेदवार स्वतत्रपणे आपल्या संघांत हिंडून मतदारामध्यें प्रचार करीत असत. आता शेकडों चौरस मैलांचा टापू व लाखो मतदार यामुळें एका उमेदवाराला स्वतःचा प्रचार करणें अशक्य झालें. अशा वेळीं प्रचाराचीं साधनें द्रुत गतीनें बदलत होतीं. 'झुडीचे मानसशास्त्र' न कळत कार्य करीत होतें. या सर्वांचा परिणाम म्हणून श्रमाच्या दृष्टीनें निवडणुकीचा प्रचार एका व्यक्तीला अशक्य झालाच. परतु खर्चाच्या दृष्टीनें देखील निवडणूकप्रचार एका उमेदवाराच्या शक्यतेच्या पलीकडे गेला. साहजिकच अनेक उमेदवार कुठल्या तरी सामान्य भूमिकेवर एकत्र येऊं लागले. या काळांत धनिकाचे हितरक्षण व मजुरांचें हितरक्षण हे दोन आर्थिक कार्यक्रम उमेदवारांना मिळाले. सामाजिक प्रगतीच्या दृष्टीनें देखील स्थितिप्रिय व प्रगमनशील असे उमेदवारांचे दोन गट पडले. त्यांच्यांतून स्पष्टपणें राजकीय पक्ष उदयाला आले. आज प्रत्येक राजकीय पक्षाला निश्चित राजकीय तत्त्वज्ञान व संघटनेमध्ये अंतर्गत लोकशाही आवश्यक आहे असें मानलें जातें. पुष्कळ पक्षांमधून या गोष्टी आढळतात.

## एकपक्ष, द्विपक्ष आणि अनेक पक्ष

आज जगामध्यें पक्षपद्धतीचे तीन प्रमुख प्रकार आढळतात. साम्यवादी राज्यांतील एकपक्षपद्धति, इंग्लंड आदि राज्यांतील द्विपक्षपद्धति आणि फ्रान्ससारख्या राज्यांतील अनेकपक्षपद्धति. यांपैकीं साम्यवादी राज्यांतील एकपक्षपद्धतीचा व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीने विचार करतां ती व्यक्तिविकासाला मारक आहे असाच निर्णय द्यावा लागेल. साम्यवादी विचारवतांच्या दृष्टीनें भांडवलशाही राज्यांत भांडवलदार व कामगार असे दोन पक्ष असतात. त्यामुळें प्रत्येक वर्गाचे हितरक्षण करणारा एक पक्ष तेथें स्थापन होणें जरूर आहे. साम्यवादी राज्यांत फक्त कामगाराचा वर्ग असल्यामुळे तेथें द्विपक्षपद्धतीला स्थान असण्याचे कारण नाहीं.कारण पक्ष हे मुख्यत: आर्थिक हितरक्षणाचे निदर्शक असतात असें त्यांना वाटतें.

साम्यवाद्याचा हा विचार व्यक्तिस्वातंत्र्याला विघातक आहे हे आज इतिहासानें सिध्द केले आहे. कारण अशा कामगार राज्यांत धनलोभासाठीं अनेक पक्ष असण्याची गरज नसली तरी सत्तालोभ आटोक्यांत ठेवण्यासाठीं विरोधी पक्षाची आवश्यकता आहे. आर्थिक सत्तेबरोबर मानवी मनामध्यें अधिकारलालसा फार प्रबल आहे हे नाकबूल करून चालणार नाहीं. त्यासाठीं तरी पक्ष-पध्दतींची गरज नाहीं काय?

साम्यवादी राज्यातील एकपक्षपद्धति व्यक्तिस्वातंत्र्याला हानिकारक आहे हें सिध्द करण्याची देखील फारशी गरज नाहीं. परंतु इंग्लंड-फ्रान्स-मधील द्विपक्ष किंवा अनेक पक्षपध्दति देखील व्यक्तिस्वातंत्र्याला मारक ठरत आहे असा विचारप्रवाह अलीकडे राज्यशास्त्रज्ञांत आढळत आहे. या राज्यशास्त्रज्ञांत मानवेंद्रनाथ रॉय जयप्रकाश नारायण यासारखे हिंदुस्थानांतील विचारवंत तर आहेतच; परंतु ऑस्ट्रॉगॉर्कीसारखे पाश्चात्य नामवंत पंडितही आहेत. पक्षपध्दतीवरील या विद्वानाची टीका केवळ नकारात्मक नाहीं तर ती विधायक किंवा भावात्मक आहे. त्यांच्या विचाराचा परामर्श व्यक्तिस्वातंत्र्याच्या समृद्धीसाठीं घेणें जरूर आहे, इतकेंच नव्हे तर अगदीं अटळ आहे.

## पक्षपद्धतींतील धोके

पक्षपद्धतीमध्यें मुख्यतः चार प्रकारचे धोके आहेत. पहिला धोका म्हणजे 'सामूहिक अहंकारांतून' ( Collective Ego ) पक्षाला हळुहळूं परमेश्वराचें स्वरूप प्राप्त होतें पक्षनिष्ठा लोकशाहीच्या निष्ठेपेक्षां उच्च मानली जाते. दुसरें संकट म्हणजे पक्षराजकारण अखेरीस सत्ताराजकारण ठरते व अधिकारप्राप्तीचे घाणेरडे खेळ सुरू होतात. तिसरे म्हणजे पक्षाच्या करड्या शिस्तीमुळें एखाद्या विधानसभेत वा संस्थेत अखेरीस अल्पसंख्याकांचें बहुसंख्यांकावर राज्य सुरु होते व लोकशाही तत्त्व अवमानलें जातें. चवथी आपत्ति म्हणजे पक्षामुळें 'राजकीय अस्पृश्यता' निर्माण होते. एक पक्ष दुसऱ्या पक्षाबद्दल असहिष्णु प्रवृत्ति धारण करतो व त्यांना अस्पृश्यासारखा टाळूं लागतो.

## सामूहिक अहंकार

इसवी सन अठराशेंच्या उत्तरार्धात युरोपमध्यें औद्योगिक क्रांति झाली. या क्रांतीचा अटळ परिणाम म्हणून मतदारसंघ विस्तृत झाले. रूसोनें मांडलेली 'प्रत्यक्ष लोकशाहीची' कल्पना अव्यवहार्य ठरली. ग्रीसमध्यें पूर्वी सर्व नागरिक एकत्र जमून आपले निर्णय घेत असत. ही लोकशाही व्यापक मतदारसंघामुळें अशक्य झाली. निवडणुका लढविणें ही बाब एकट्या दुकट्या उमेदवाराला अवघड झाली. कारण प्रचाराचें क्षेत्र मोठें झाले. प्रचाराचीं साधनें बदललीं. यासाठीं शेकडों रुपयांचा खर्च होऊं लागला. 'लोकमताचे' नवे मानसशास्त्र तयार झालें. थोडक्यांत म्हणजे निवडणुकांचें तंत्र आणि मंत्र झपाट्यानें बदलले यासाठीं उमेदवारांना संघटितरीत्या प्रयत्न करण्याची गरज भासूं लागली. या जाणिवेंतूनच पक्षपद्धतीचा उदय झाला. आपल्या विविध राजकीय गरजा भागविण्यासाठीं माणसानें राजकीय पक्ष स्थापन केले. माणूस हाच या पक्षपद्धतीचा निर्माता आहे. परंतु दुर्दैव असें कीं निर्माताच कधींकधीं आपल्या निर्मितीचा गुलाम होतो व इतिहास बदलून जातो. पक्षपद्धतीबद्दल असाच कांहींसा प्रकार झाला आहे. या राजकीय पक्षांच्या संघटनेला हळुहळूं 'सामूहिक अहंकाराचें'

स्वरूप प्राप्त झालें. या 'सामाजिक अहंकाराला' अवास्तव प्रतिष्ठा मिळूं लागली. पक्षाला अव्यक्त, अमूर्त देवतेचें स्थान दिलें जाऊं लागलें. या मानसशास्त्रीय प्रवृत्तींतून पक्षाची पूजा सुरू झाली. पक्षाचें वैभवीकरण हें साध्य बनलें व पक्षांतील व्यक्ति साधन ठरलें. पक्ष आणि व्यक्ति यांचे संबंध वास्तविक उलट असावयाला हवे होते. पक्षासाठीं व्यक्ति नसून, व्यक्तीसाठीं विविध पक्ष असतात. परंतु येथें हा क्रम बदलला. त्यामुळे पक्षांसाठीं सभासदांनीं सर्वस्व अर्पण करावें याला महत्त्व प्राप्त झाले. पक्षांच्या वेदीवर सभासदाचे सर्वस्व अर्पण करणे याला पक्षनिष्ठा असे मोहक नांव दिलें जाऊं लागले. अशी पक्षनिष्ठा म्हणजे व्यक्तित्वाच्या मृत्यूचें दुसरे नांव असतें. परतु या निष्ठेला अकारण श्रेष्ठत्व मिळाले व माणसाचे मध्यवर्ति स्थान व सार्वभौमत्व नष्ट झालें. माणसानें पक्ष निर्माण केले. परंतु माणूसच या पक्षाचा गुलाम बनला. निर्माता आपल्या निर्मितीचा अंकित झाला म्हणजे दुःखान्तिका सुरू होते. पक्षपद्धतीने या शोकपर्यवसायी नाटकाची नांदी केव्हाच गायिलेली आहे. 'सामाजिक अहंकाराची' मानसशास्त्रीय मीमांसा देखील आपण केलेली आहे. अशी पक्षपद्धति राज्यांत रूढ झाली तर लोकशाही किंवा व्यक्तिस्वातत्र्य प्रबल होईल काय ?

## पक्षराजकारण हें सत्ताराजकारण

वरील अटळ धोक्यांप्रमाणें दुसरी आपत्ति म्हणजे पक्षराजकारणाला प्राप्त होणारें सत्ताराजकारणाचे गलिच्छ स्वरूप ! वास्तविक लोकशिक्षण हें पक्षाचें साध्य व सत्ता हे त्याचें साधन आहे. परंतु येथेंही सत्तेच्या साधनाला प्राधान्य मिळतें व लोकशिक्षणाच्या साध्याला फार गौण स्थान मिळूं लागतें. लोकांना शहाणे करणे, त्यांना राजकीय ज्ञान देणें ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. जनतेला राजकीय धडे देऊन पक्ष आपल्या कार्याचा प्रचार करूं लागले तर त्यांत कांहीं अनुचित नाहीं. परंतु पक्ष हा मार्ग फार दूरचा म्हणून टाकून देतात. राजकीय शिक्षण हा सत्ता हस्तगत करण्याचा फार लांबचा रस्ता आहे. तेथें बुद्धीला आवाहन करावयाचें असतें.

त्यापेक्षां मतदाराच्या भावनांना आवाहन करणें सोपें आणि सोयीस्कर असतें. राणा भीमदेवी थाटाचीं भाषणे करून भावना पेटविणें, प्रक्षोभक पत्रकें काढून भावना चेतविणे, ज्यामुळें झुंडीचा उन्माद (mass hysteria) निर्माण होईल असें कांही तरी मार्ग अवलंबिणे पक्षांना सोयीचें असते. कारण या मार्गानें भावनाच्या प्रभावाखालीं बुद्धि लुप्त होते व त्या पक्षांच्या विचाराची तपासणी दुर्मिळ होते. शिवाय सत्ता हस्तगत करण्याचा हा सगळ्यांत जवळचा रस्ता आहे. एका पक्षानें या मार्गाचा अवलंब केला तर दुसऱ्या पक्षाला याच पद्धतीचा स्वीकार करावा लागतो. कारण मतदाराची विवेकशक्ति जागृत करून त्याची मते मिळविण्याइतका त्याना वेळ असतो कुठे? व तो बेभरंवशाचा मार्ग पत्करा तरी का? यामुळें या विविध पक्षामध्ये मतदाराना शिक्षण देण्याऐवजीं त्याना भुलविण्याची नवी शर्यत सुरू होते. या चढाओढीत ज्याला विजय मिळेल त्याला अधिकारप्राप्ति होईल म्हणून प्रत्येक पक्ष लोकाना बनावण्याची सर्व कोशिस करूं लागतो. लोकशाही अशा वेळीं 'लोकाना बनविणारी शाही' न बनली तरच आश्चर्य. झुडीचे मानसशास्त्र प्रगत झालेल्या आजच्या काळात ही भीति वाढत चालली आहे. प्रचाराच्या जोरावर सारा समाज हे पक्ष भारून (Hypnotise) टाकण्याचा प्रयत्न करतात. या स्पर्धेमुळे जनतेशीं पक्षाचा दुष्ट खेळ सुरू होतो व त्याना सत्ताप्राप्तीचे किळसवाणें स्वरूप प्राप्त होते. या सर्व खेळांत सार्वभौमसत्तेचें केंद्र असलेली खुद्द जनता 'प्याद्या' प्रमाणें वापरली जाते. पक्षराजकारणात सत्ताकाक्षेला मिळणारे प्राधान्य अपरिहार्य असतें. व त्यातून निर्माण होणारी ही लोकशाहीची विकृति अटळ ठरते.

## अल्पमतांचें राज्य

पक्षपद्धतीमुळें वरील दोन्ही धोक्याप्रमाणें तिसरा धोका फार मोठा आहे. त्यामुळे लोकशाहीच्या मुळावरच आघात केला जातो. लोकशाही म्हणजे बहुसंख्यांकांचे राज्य (rule of majority) हें सर्वमान्य आहे. परंतु पक्षांमुळें बहुसंख्यांकांऐवजीं अल्पसंख्यांकांचें बहुमतवाल्यांवर

राज्य सुरू होते. हें विधान सत्कृतदर्शनी फसवे वाटेल म्हणून उदाहरणानें हे सिद्ध करूं या ! समजा, एखाद्या विधान सभेंत शंभर सभासद आहेत. तेथे कॉंग्रेसप्रमाणे इतर पक्ष आहेत. कॉंग्रेसचें संख्याबल ५१ असून इतर सर्व पक्षाचें संख्याबल ४९ असे आहे. विधानसभेपुढे एखाद्या कराचें बिल आल्यावर कॉंग्रेसचा विरोध असला तर तें नापास होईल. परंतु कॉंग्रेसचा या बिलाला विरोध म्हणजे कॉंग्रेसच्या ५१ सभासदाचा एकजात विरोध असे कधीं नसते. या ५१ सभासदापैकीं ३० सभासदाचा विरोध असला तरी भागते. पक्षाच्या सभेत ३० विरुद्ध २१ मतानीं हे बिल फेटाळलें जाते. पक्षाच्या शिस्तीमुळे विधानसभेत कॉंग्रेसच्या या २१ सभासदावर तो निर्णय बधनकारक असतो. विधानसभेत तो ठराव ४९ विरोधकाना मान्य असतो. शिवाय कॉंग्रेसमधील २१ सदस्याना देखील तो मंजूर असतो. म्हणजे शंभरपैकीं ७० सभासदांना ठराव संमत असतो. परतु केवळ ३० सभासदाच्या जोरावर तो ठराव फेटाळला जाऊ शकतो. अल्पसंख्याकाचा बहुसख्याकावर होणारा हा जुलूम केवळ पक्षपद्धतीमुळें असतो. पक्षाची करडी शिस्त काढून घेतली तर विधानसभेचा सारा निर्णय बदलला जाईल. याची प्रचीति दिल्लीच्या विधानसभेंत 'हिंदुकोड बिला'च्या वेळीं सर्वांना आलेली आहे. यात इतिहासाची पुनरावृत्ति सर्वत्र वेळोवेळीं होणे अशक्य नाहीं. पक्षपद्धतीचा 'लोकशाही' वर होणारा हा 'बलात्कार' समर्थनीय आहे असें पक्षनिष्ठ तरी म्हणतील कां ? त्यानीं असे म्हटलें तर त्याची निष्ठा लोकशाहीच्या श्रेष्ठ मूल्यापेक्षा एका पक्षालाच अधिक आहे असं म्हणावें लागेल. राज्यात बहुमतवाल्याची सत्ता असते परंतु या बहुमतवाल्यांवर त्याच्या राजकीय पक्षांचा ताबा असतो. म्हणजे पर्यायानें राज्यावर हे पक्षच राज्य करतात असें म्हणावे लागेल. पक्षाचे निर्णय हे देखील खऱ्या अर्थाने पक्षाचे नसतात. पक्षामध्यें एखादाच नेता कणखर आणि बुद्धिमान असतो. हा पुढारी अनेक वेळा आपले निर्णय इतरांवर लादीत असतो. त्याच्याकडे नेतृत्व गेलेलें असते. याला कारण त्याची अचूक निर्णयशक्ति असतेच असें नाहीं. सत्तालालसा आणि कपूशाही यांच्या बळाबर देखील तो हें धुरीणत्व आपल्याकडे घेत असतो. गत आयु-

ष्यातील 'त्यागा'चें ( हा त्यागही कित्येकवेळा विवाद्य मुद्दा असतो. ) भांडवल त्याला उपयोगी पडते. अशा वेळीं आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या जोरावर हे नेते आपला निर्णय इतर सभासदावर लादतात. सर्वच सभासद या पक्षातील 'अनभिषिक्त राजा'पुढे मान तुकवितात असें नाहीं. ते त्याच्याविरुद्ध बंडही पुकारतात. परतु स्वतत्र अस्तित्व घोषित करणाऱ्या या बडखोराना पक्षाशीं बेइमानी केली या नावाखालीं पक्षातून हाकलून दिलें जाते. त्याच्यावर 'पक्षद्रोहा'चा वा बेशिस्त वर्तनाचा "आरोप" (!) ठेवला जातो. याचा प्रत्यय कॉंग्रेसच्या सघटनेमध्ये बॅ. नरिमन, देशगौरव सुभाषचद्र बोस, डॉ. ना. भि. खरे याच्या बाबतींत आला आहे. हा मुद्दा वादग्रस्त असला तरी प्रस्तुत लेखकाचे तरी असें मत आहे. पक्षाशिवाय इतर पद्धतीत हा धोका नाहीं असे नाहीं. बुद्धिमान् व सत्ताकाक्षी हे कुठल्याही समाजव्यवस्थेत सामान्य सभासदावर अधिकार गाजविणारच. परतु त्यात मोठी तफावत पडेल असे वाटते.

## राजकीय अस्पृश्यता

वरील तिन्ही मुद्याप्रमाणे शेवटचा चवथा मुद्दा म्हणजे पक्षामुळे निर्माण होणारी " राजकीय अस्पृश्यता" समाजात आज अस्पृश्यता नष्ट करण्याचे प्रयत्न चालू आहेत. त्याना थोडेसे फळही आलेलें आहे. परतु एका दिशेनें नष्ट होणारी अस्पृश्यता दुसऱ्या बाजूने आमच्या जीवनात घुसत आहे. पक्षनिष्ठेमुळे सभासद दुसऱ्या पक्षातील चागल्या विचाराकडे दुर्लक्ष करतो आणि आपल्या पक्षातील वैगुण्याकडे डोळेझाक करतो. इतकेंच नव्हें, तर आपले दोष हेच सद्गुण आहेत असा बहाणा करू लागतो. आपल्यातील चागल्या भागाचे अवास्तव स्तोम माजविणे हें तर त्याचें जणुं जीवनकार्यच असतें ! यातून शेवटीं अशी भूमिका निर्माण होते कीं माझ्या पक्षाचे तेवढे सर्व चांगलें व इतर पक्षाचे तेवढें एकजात वाईट ! या प्रवृत्तींतूनच असहिष्णुता निर्माण होते. पूर्वी धर्मांच्या बाबतींत अशीच भूमिका धार्मिक माणसामध्ये निर्माण झाली होती. सर्व सत्य फक्त माझ्याच धर्मानें सागितलें आहे व इतर धर्मांनीं सांगितलेली सर्व सत्यें 'असत्य' आहेत

अशी त्याची समजूत होती. इस्लाम धर्मीयांनीं हा कडवेपणा पूर्णांशानें व्यक्त केला. जुन्या धर्मांचें हे 'उदात्त आणि उज्ज्वल कार्य' आज राजकीय ' पक्ष ' करीत आहेत. दुसऱ्या पक्षाचें ध्येय व धोरण अधःपाताकडे नेणारें असून माझाच पक्ष फक्त देशोन्नति करणार असा आंधळा विश्वास सभासदात निर्माण होतो. त्यांतूनच कडवा विरोध सुरू होतो. त्याचे पर्यवसान तीव्र द्वेषात होतें. इतर पक्षीयाना हे सभासद अस्पृश्याप्रमाणें टाळूं लागतात. त्याच्याशीं राजकारणांत तर नव्हेच, पण खाजगी जीवनांतही असहकार पुकारला जाऊ लागतो. हा मानसिक अधःपात दुःखदायक आहे; परंतु तो अटळ म्हणून हें दुःख द्विगुणित होते. पक्षाची अशी चौकट निर्माण झाली म्हणजे इतराबद्दल कडवटपणाने बोलणें हे देखील जणूं पक्षनिष्ठेचें लक्षण मानले जाऊं लागते व इतर पक्षीयाच्या भूमिकेबद्दल सहिष्णुतेनें, सावधानतेनें बोलणाऱ्या सभासदाच्या पक्षप्रेमाबद्दल शका घेतली जाऊं लागते. पक्षाच्या साच्यात हा अधःपात अपरिहार्य ठरतो. त्यामुळें चांगले विचारी पुरुष देखील इतर पक्षीयाशीं अशाच भूमिकेवरून वागू लागतात. या असहिष्णु आणि अध प्रवृत्तीतून सत्यान्वेषण होणे कदापि तरी शक्य आहे का ? आणि सत्याचा शोध हे तर लोकशाहीचें उज्ज्वल कार्य आहे ना? परंतु या हेतूची पक्षपद्धतीमुळे अशी केविलवाणी स्थिति होणें अगदी अटळ आहे.

या विविध कारणामुळे पक्षपद्धतीबद्दल लोकशाही प्रवर्तकाचा आज अनुकपनीय भ्रमनिरास झाला आहे. या पद्धतीचा अंगिकार आपल्या राजकीय संस्थांत करून तेथील प्रगतीची आशा नष्ट करावयाची का पक्षपद्धतीला पर्याय सुचवून प्रगति अबाधित चालू ठेवावयाची असा प्रश्न आजच्या सर्व पंडितांसमोर पडला आहे.

पक्षपद्धतीच्या दोषांची चर्चा करतांना तिच्या गुणाना डावलण्याचा वा अवमानण्याचा हेतु नाहीं. या संस्थेने गेल्या शतकभर मानवाची राजकीय गरज भागविलेली आहे. या राजकीय पक्षामुळेंच अनेकाना कार्यप्रेरणा मिळाली व थोडीफार लोकजागृति झाली. या संस्थेची ही कामगिरी उल्लेख-

-नीय आहे. परंतु गेल्या शंभर वर्षांत आपल्या अनुभवाने आपणांस कांहीं धडे शिकविले आहेत. त्याच्यापासून कांहीं बोध आपण घेतला पाहिजे. केवळ भूतकालीन कामगिरीवर कोणालाही भविष्यकाळात जीवदान देता येणार नाहीं. पक्षपद्धतीचें एवढें अंतरंग व्यक्त झाल्यानतर आतां या पद्धतीचे विसर्जन करणेच अधिक उचित आहे.

पक्षपद्धतीचा त्याग केल्यानंतर तिची जागा घेणारा दुसरा कोणताच विश्वसनीय मार्ग आज टीकाकारांना दिसत नाहीं. त्यामुळे पक्षविसर्जनाची भाषा त्यांना अव्यवहार्य वाटते. किंवा कल्पनेच्या पखावर बसून स्वप्नसृष्टींत मारलेली ती एक भरारी वाटते. परंतु पक्षपद्धतीला पर्याय म्हणून विचारवंतांनीं कांहीं विधायक कल्पना माडलेल्या आहेत. त्याचाही विचार करणें आवश्यक आहे.

## ऑस्ट्रॉगॉर्स्कींची कमिटी पद्धति

ऑस्ट्रॉगॉर्स्की या राज्यशास्त्रज्ञानें Democracy and the Organization of Political Parties हा ग्रथ या शतकाच्या अगदीं प्रारभीं लिहिलेला आहे. परंतु पन्नास वर्षांपूर्वी लिहिलेल्या या ग्रथांत पक्षपद्धतीच्या गुणदोषाची चर्चा फार मूलगामी पद्धतीने केली आहे. लेखकाच्या मताप्रमाणे पक्षपद्धतींतून सारे दोष निर्माण झाले याचे सर्वांत महत्त्वाचें कारण म्हणजे या सघटनेला कायम स्वरूपाचे स्थान मिळाले हें होय. पक्षसंस्था चिरस्थायी झाली कीं तिच्यांतून सर्व आपत्ति निर्माण होतात. कायम संघटनेमुळे हळुंहळूं पक्षपूजा सुरू होते, सत्तास्पर्धा उदयाला येते, राजकीय असहिष्णुता निर्माण होते व व्यक्तीचे सार्वभौमत्व लोप पावतें. या सर्वांचें मूळ पक्षाचें चिरस्थायी स्वरूप हे असल्यामुळें हें स्वरूप नष्ट झालें पाहिजे. पक्षाची कायम संघटना नाहींशी झाली तर करडी शिस्त कमी होईल व बहुमताचें राज्य खऱ्या अर्थाने अस्तित्वांत येईल.

पक्षपद्धतीला त्यानें एक पर्याय सुचविला आहे. त्याचें स्वरूप सध्याच्या नियुक्त समितीसारखें ( Ad hoc Committee ) आहे. त्याच्या मतें

विधिमंडळांत पक्षाऐवजीं विविध संघ निर्माण होतील आणि विधिमंडळां-तील सभांना विविध प्रश्न आणि ठराविक कालखंड यांच्या मर्यादा पडतील. उदाहरणार्थ, मुंबई विधान सभेत प्रतिपद विक्री कर आला तर त्यावेळीं पक्षाने आपले निर्णय सभासदावर लादूं नयेत. सभासदानीं आपल्या मता-प्रमाणे विधानसभेत दोन संघ निर्माण करावे. एक संघ विक्रीकराला अनुकूल राहील, दुसरा प्रतिकूल राहील. या दोन संघानीं आपल्या मताचा प्रचार जनतेत करून त्याप्रमाणे लोकजागृति करावी. या प्रश्नावर विधानसभेतील सभासदांचें दोन संघ निर्माण होतील. परंतु या संघाचे अस्तित्व या प्रश्नापुरते आणि विशिष्ट कालापुरतेच मर्यादित राहील. याच विधानसभेसमोर जर दारूबंदीचा कायदा आला तर या कायद्यावर पुन्हा दुसरेच दोन संघ निर्माण होतील. त्यांचेही आयुष्य पुन्हा तो प्रश्न आणि ठराविक काळ यानीं मर्यादित केले जाईल. Ad hoc Committee सारख्या या नव्या पद्धतीमुळे पक्षाचे चिरस्वरूप नष्ट होईल व व्यक्तीचे सार्वभौमत्व सुरक्षित राहील.

ऑस्ट्रॉगॉर्स्कीच्या या कल्पनेमध्ये काहीं प्रमाणात उणीवा आणि दोष असण्याचा संभव आहे त्याच्या या पद्धतीमुळे कदाचित विधानसभेत अनेक पक्ष निर्माण होऊन स्थैर्य भंगेल. सभासदाना एकत्र साधणारा शिस्तीचा दुवा नष्ट झाल्यामुळे कदाचित् अव्यवस्था आणि गोंधळ माजेल. परंतु अशा काहीं दोषापेक्षा फायदाही जास्त होण्याचा संभव आहे. नुक-सानीपेक्षां नफ्याचे पारडे जड होणार असेल तर या योजनेचा विचार-वंतानीं विचार न करण्याचे काय कारण आहे ?

## कॉ. रॉय यांच्या जनता-समित्या

ऑस्ट्रॉगॉर्स्कीप्रमाणे कॉ. मानवेंद्रनाथ रॉय यानीं देखील पक्षपद्धतीऐवजीं 'जनता-समित्या' ( People's Committee ) चा पर्याय सुचविला आहे. ऑस्ट्रॉगॉर्स्कीने पक्षपद्धतीच्या अरिष्टाचे मूळ तिच्या प्रकृतींत असल्याचें सांगितलें. कॉ. रॉय यानीं हें रोगनिदान दुसऱ्या पद्धतीनें केले आहे. त्यांच्या मतें आजच्या अप्रत्यक्ष लोकशाहीमुळें राज्यसंस्था आणि जनता

यांच्यामध्ये राजकीय पक्षाने 'दलाल' निर्माण झाले व या मधल्या राजकीय दलालांनीं लोकाच्या सार्वभौम सत्तेचे अपहरण केलें. मध्ययुगांत परमेश्वर आणि भक्त यांच्यामध्ये पुरोहितवर्ग निर्माण झाला. परतु या मधल्या परमेश्वराच्या दलालाने भक्ताची सर्व सपत्ति, सत्ता व सामर्थ्य आपल्यामध्यें एकवटवले व त्याला अकित केले. तसाच काहींसा प्रकार या राजकीय पक्षांनीं केला आहे. आजचे राजकीय पक्ष हे मध्ययुगातील पोप किंवा हिदुस्थानातील पुरोहित याच्यासारखेच सत्तेचे अपहरण करणारे आहेत. यासाठीं हा मधला वर्गच नष्ट झाला पाहिजे. राज्यसस्था आणि जनता याचा सबंध प्रत्यक्षरीत्या आला पाहिजे.

ही कल्पना मूर्त स्वरूपात आणण्यासाठीं कॉ. रॉय यांनीं आपल्या जनता-समितीची कल्पना माडली आहे. ते म्हणतात, "प्रत्येक गावामध्ये तेथील नागरिकाची एक समिति स्थापन झाली पाहिजे. गावाचा व प्राताचा कारभार या समितीनेच पाहिला पाहिजे. या समितीला मार्गदर्शन मिळेल ते गावातीलच काहीं सुशिक्षित तरुणाचे ! हे तरुण या समितीला फक्त राजकीय शिक्षण देतील. थोडक्यात, या समित्या लोकाच्या राजकीय शाळा ठरतील व हे तरुण या शाळेतील शिक्षक राहतील त्याची भूमिका मित्र, मार्गदर्शक आणि तत्त्वज्ञ अशी तिहेरी राहील. हे शिक्षक अर्थात्च सत्तास्पर्धेपासून अलिप्त राहतील. या विशिष्ट वर्गाला सत्ता हस्तगत करण्याचें कार्य करावयाचे नसल्यानें ते लोकाना फक्त राजकारणाचे पायाशुद्ध ज्ञान देतील. याच मार्गाने लोक शहाणे होतील व जागरूकतेने आपले हितरक्षण करतील. अशाच समित्या देशभर स्थापन केल्या जातील व पिरॅमिडप्रमाणें या सर्व समित्यांची रचना केली जाईल. विधानसभेंत निरनिराळ्या भागांतून येणाऱ्या सभासदाकडून विषयाच्या मूल्यावर निर्णय घेतला जाईल. ठराव पास करतांना पक्षाच्या शिस्तीपेक्षां ठरावाचें गुणावगुण जास्त विचारात घेतले जातील. या मार्गाने ज्याला संघटित लोकशाही (Organised democracy) म्हणतात ती कल्पना प्रत्यक्षांत येईल व व्यक्तीचें सार्वभौमत्व कसोशीने रक्षिलें जाईल.

. पक्षविसर्जनामध्यें कांहीं दोष अपरिहार्य आहेत असे वाटते. पक्षाच्या विसर्जनामुळें व्यक्तीच्या मनांतील कार्याची प्रेरणा ( incentive ) कमी होते किंवा नष्ट होते. पक्षामध्ये ही प्रेरक शक्ति मात्र निश्चित असते. ही प्रेरणा कदाचित् सामूहिक अंहकारातून येत असेल; कदाचित् फ्रोम ( Fromme ) लेखकाने Fear of Freedom मध्यें म्हटल्याप्रमाणें कोणाशीं तरी निगडित असण्याच्या जाणिवेंतून (sense of belonging) मधून येत असेल; परतु पक्षपद्धतींत ही कार्यप्रेरणा आहे आणि पक्षविसर्जनांत ती नष्ट होते असे वाटते. म्हणजे पक्ष नसला तर कार्याची प्रेरकशक्ति नाहींशी होते व तो असला तर लोकशाही व व्यक्तिस्वातत्र्य नष्ट होते अशी ही शृंगापत्ति आहे. ही टाळायची कशी हा प्रश्न आहे.

या प्रश्नाचे उत्तर कठीण असलें तरी अशक्य नाही. ' सामूहिक अहंकाराची ' निर्माण झालेली पोकळी ' व्यक्तिनिष्ठेनें ' भरून काढली पाहिजे. स्वत.च्या सर्जनशील शक्तीवर व्यक्तीची अपार श्रद्धा असली पाहिजे. लोकशाही-मूल्यावरील त्याचें प्रेम अमर्याद असलें पाहिजे. व्यक्तीच्या सुप्त शक्तीवरील असीम निष्ठाच ही पोकळी भरून काढील व लोकशाही त्याला कार्यप्रेरित करील

## युगोस्लाव्हियांतील विचारप्रवाह

ऑस्ट्रॉगॉर्स्की आणि मानवेद्रनाथ रॉय याच्याप्रमाणेच व्लाडिमेर देदियेर या युगोस्लाव्हियातील राज्यशास्त्रज्ञाने असेच विचार व्यक्त केलेले आहेत. पक्षपद्धतीच्या अपयशाबद्दल त्याची खात्री झाली असून तिच्या उच्चाटनासाठीं ते नवी योजना तयार करीत आहेत.'The Theoretical Thought in Yugoslavia' या ग्रथात त्यांनीं आपली विधायक कल्पना मांडली आहे. पक्षविसर्जनासबंधीं त्यांचे विचार मननीय आहेत. ते एका मुलाखतींत म्हणतात, "कम्युनिझमच्या प्रस्थापनेसाठीं कम्युनिष्ट पक्षाच्याही विसर्जनाची आवश्यकता आहे. आम्हांला बहुपक्षीय अगर एकपक्षीय लोकशाही नको. खरी लोकशाही अपक्षीय असली पाहिजे" "अखेरीस कम्युनिस्ट पक्षाचेही विसर्जन" ले. श्री. प्रभाकर पाध्ये ( रचना- जानेवारी १९५२).

कॉ. मानवेंद्रनाथ रॉय, ऑस्ट्रॉगॉस्की किंवा ब्लाडिमेर देदियेर या पंडितांनीं वरील सुचविलेले मार्ग सदोष असतील. कदाचित् फार दूरचे असतील. परतु त्यामुळें आजच्या काळाची गरज काय आहे हें व्यक्त होतें. शिवाय व्यक्तिस्वातंत्र्याचा विकास कोणत्या दिशेनें होणार याचीही कल्पना येते. लोकशाही आणि व्यक्तीचे सार्वभौमत्व यांचें संरक्षण आणि सवर्धन करावयाचे असेल तर पक्षपद्धतीची जागा दुसऱ्या पद्धतीनें घेतली पाहिजे. या नव्या पद्धतीचा गभीरपणें विचार करण्याची वेळ आतां आली आहे.

## व्यक्तिस्वातंत्र्य आणि शिक्षणाचें नवे निरामय तत्त्वज्ञान

आतांपर्यंत व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टिकोनातून आर्थिक आणि राजकीय सत्ता-विकेंद्रीकरणाचा विचार केला. त्याचप्रमाणे तो शैक्षणिक दृष्ट्या देखील झाला पाहिजे. कारण आयुष्याची प्राथमिक तयारी ही शाळामधूनच होत असते. तेथेच या तत्त्वज्ञानाला पोषक असे शिक्षण मिळाले तर या नव्या समाज-व्यवस्थेचे काम सुकर होईल. माणसाचा वैचारिक पिंड तीन केंद्राकडून घडविला जातो. त्याचे कुटुंब, समाज आणि शाळा यांपैकीं कुटुंबाचा विचार फारसा करणे येथें शक्य नाहीं. सामाजिक वातावरणाचा विचार आतांपर्यंत झाला. राजकीय आणि आर्थिक विकेंद्रित सत्तेमुळें समाजांत व्यक्तिस्वा-तंत्र्याला अनुकूल वातावरण तयार होईल. परंतु मनुष्याचा संबध कुटुंब आणि समाज यांच्याप्रमाणे शालागृहाशीं येतो. त्याचा मनःपिंड या विद्यालया-तून घडविला जातो. जन्माचें सारे नसले तरी पुष्कळ संस्कार तो येथें घेऊनच बाहेर पडत असतो. या दृष्टीनें व्यक्तिस्वातंत्र्याच्या या पुरोगामी विचाराला पूरक असणारे वैचारिक खाद्य त्याला तेथें दिलें गेले पाहिजें. त्यासाठीं निरोगी शैक्षणिक तत्त्वज्ञानाचा पुरस्कार या सर्व विद्यामंदिरांतून झाला पाहिजे. सहकार्याचे हें नवें सामाजिक तत्त्वज्ञान आणि शिक्षणाचे तत्त्वज्ञान यामध्ये सवादित्व साभाळलें पाहिजे. या दोहोंमध्यें बिसंवाद निर्माण झाला कीं तेथें नवीन संकटें सुरू झालींच म्हणून समजा ! शाळेंत शिकविले जाणारें तत्त्वज्ञान मात्र स्पर्धाप्रधान आणि समाजाची जीवननिष्ठा मात्र सहकार्ययुक्त ! अशी विसगति झाली कीं मग व्यक्तीचीं या परिस्थि-

तीशी जुळवून घेण्यासाठी केविलवाणी धडपड सुरू होते. यासाठीं सहकारी समाजव्यवस्थेला पोषक असें शिक्षणाचे तत्त्वज्ञान असणें आवश्यक आहे.

## हुकुमशाही राष्ट्रांतील शिक्षणाचें तत्त्वज्ञान

जगांत आज मुख्यतः शिक्षणविषयक दोन जीवननिष्ठा वावरत आहेत. एक सर्वाधिकारशाही राष्ट्रातील (Totalitarian States) आणि दुसरी लोकशाही राष्ट्रातील. यांपैकीं सर्वाधिकारशाही राज्यांतील शिक्षणाचें तत्त्वज्ञान त्यानीं त्यांच्या जीवनविषयक सिद्धान्ताला पोषक बनविलें आहे. त्यांच्या विचार-धारेप्रमाणें 'समूहाचे हित' हें सर्वश्रेष्ठ हित असते. व्यक्ति या प्रामुख्याने समूहासाठीं जगत असतात. समष्टीच्या कल्याणामध्ये व्यक्तीच्या जीवनाचा मोक्ष असतो. थोडक्यात, समूह हा त्याचा देव असतो. त्याच-प्रकारचे संस्कार त्यांच्या शिक्षणव्यवस्थेतून दिले जातात. त्याच्या शिक्षण-क्रमांतून हेंच विचाराचें सूत्र गोवलेलें असतें. इतिहास शिकवितांना इति-हासांतील वरील विचारावर आधारलेल्या घटना जास्त गौरवाने उल्लेखिल्या जातात. या प्रमेयाला अनुकूल अशा ऐतिहासिक पुरुषाला सर्व महत्त्व दिलें जातें. काव्य शिकवितांना देखील काळजीपूर्वक अशा कविताची निवड केलेली असते. शाळेंत सांघिक गीतें म्हणताना समूहवादाची महती गाइलेली असते. थोडक्यात प्रत्येक प्रसंगांतून क्षणोक्षणीं 'समूह' कसा थोर असतो हेंच शिकविले जातें. संस्कारसुलभ मुलाच्या मनावर ठसविलेला हा विचार मरेपर्यंत त्यांची सोबत करतो. मनाला वळण याच दिशेनें मिळते. याचें प्रत्यंतर जर्मनी, इटली, जपान येथील शिक्षणक्रमातून येतें. हे विचार मुलांच्या कोंवळ्या मनावर ठसविले कीं ते हेंच ऋण घेऊन समाजांत वावरतात. तेथील सामाजिक निष्ठेशीं हे विचार जुळणारे असल्यामुळे तेथें संघर्ष निर्माण होत नाहींत.

## वर्गसंघर्षावर आधारलेली साम्यवादी शिक्षणपद्धति

हुकुमशाही राज्याप्रमाणें साम्यवादी देशांतही व्यक्तीला गौण स्थान देऊन समूहाला अवास्तव महत्त्व दिलेलें असतें. अर्थात् या 'समूहा'चें स्वरूप

निरनिराळ्या हुकुमशाही राज्यात विविध प्रकारें प्रत्ययाला येतें. उदाहरणार्थ, फॅसिस्ट इटलीमध्यें राष्ट्रवाद हाच सर्व मूल्यांचा मानदंड मानला जाऊन त्याला सर्वांनीं शरण जावे असा विचार माडलेला असतो. नाझीवादी जर्मनीमध्यें राष्ट्रवादापेक्षां वंशश्रेष्ठतेला प्राधान्य देऊन एखाद्या पुरुषोत्तमाला सर्वांनीं आपले सार्वभौमत्व अर्पण करावे असें सागितलेले असते. साम्यवादी रशियात राष्ट्रवाद किंवा लोकोत्तर पुरुष यापेक्षा 'समाजहित' या अमूर्त कल्पनेला सर्वस्व मानण्याची शिकवण दिली जाते. समाजाचें हित हें व्यक्तीच्या हिताहून वेगळे आहे इतकेच नव्हे, समाजहित हेच साध्य असून व्यक्ति केवळ साधनभूत आहे असें शिकविलें जातें. या विचारातील तर्क-दुष्टता घातक आहे. कारण अनेक व्यक्तींचा समुच्चय म्हणजे समाज होय. प्रत्येक व्यक्तीचा उत्कर्ष हाच समाजाचा उत्कर्ष आहे, व्यक्तीच्या विकासा-वांचून समाजाचा विकास होणें केवळ अशक्य आहे. परंतु साम्यवादी विचारांतील 'समाज' ही अमूर्त कल्पना याहून वेगळी आहे. तेथें समाज-हिताची कल्पना प्रत्येक व्यक्तीच्या हिताहून वेगळी असून त्या कल्पनेला स्वतःचें अस्तित्व आहे. सर्व व्यक्तींच्या समुदायाहून समाजहित निराळें आहे असें तेथे सतत सांगितले जातें हा विचार व्यक्तिवादाशीं संवादी होऊं शकत नाहीं.

साम्यवादी शिक्षणपद्धतींतील अमूर्त समाजहिताच्या कल्पनेप्रमाणें दुसरा दोष म्हणजे साम्यवादाचें वर्गविग्रही तत्त्वज्ञान ! मानवी इतिहास हा वर्ग-युद्धाचा इतिहास असून वर्गसंघर्ष हाच त्याच्या प्रगतीचा पाया आहे असें त्यांचें मत आहे. भांडवलदार आणि मजूर यांचा झगडा सर्वव्यापी असल्यामुळें त्यांचें हें वर्गीय तत्त्वज्ञान शिक्षणाच्या क्षेत्रांतहि झिरपलें आहे. साम्यवादी शाळा-कॉलेजांतून वर्गसंघर्षाचे विचार प्रामुख्यानें विद्यार्थ्यांच्या मनावर बिंबविले जातात. याबाबत लेनिननें एके ठिकाणीं म्हटले आहे,

"We deny any kind of morality which is taken from the non human and non-class conception, and we regard such morality as a fraud and a deception which

blocks the minds of workers and peasants in the interests of landowners and capitalists, We say that our morality is entirely subservient to the interests of the class struggle of the proletariat.'

( वर्गभेद न मानणारी किंवा अमानवी अशी कोणताहि नीति स्वीकारण्यास आम्ही तयार नाहीं. अशा प्रकारची नीति म्हणजे ढोंग आणि फसवणूक असते. या नीतीमुळे कामकरी आणि शेतकरी याचीं मनें मर्यादित अर्थानें मारलीं जाऊन त्याचा फायदा जमीनदार आणि भाडवलदार यांना होतो. आमचें असें मत आहे की कामगारहित हेंच प्रमुख असून वर्गीय लढ्यामध्यें ही नीति केवळ दुय्यम आहे )

वर्गीय संघर्षावर आधारलेलें हे साम्यवादी शिक्षणाचे तत्त्वज्ञान व्यक्ति-विकासाला पोषक ठरण्याऐवजी मारकच ठरण्याचा संभव अधिक आहे. कारण वर्गयुद्ध हा नियम आहे असे गृहीत धरल्यानंतर तेथें सर्वांमध्यें सह-कार्याची भावना कशी निर्माण होणार ? अशा वर्गीय तत्त्वज्ञानामध्ये सर्व मानवाचा समावेश करणारा विचार बसूं शकत नाहीं. शिवाय मानवी इतिहासाचा त्याचा वर्गवादी अर्थ देखील निर्दोष आहे असें म्हणवत नाहीं. कारण मानवी इतिहासामध्ये वर्गसंघर्षाप्रमाणे वर्गसहकार्य असल्याचें आपल्या प्रत्ययास येतें. मानवाच्या शास्त्रीय आणि सामाजिक प्रगतीसाठीं दोन्ही वर्गांतील विचारवत आणि लोक एकत्र येऊन नवें विचारधन निर्माण करीत असल्याचा निर्वाळा मानवी इतिहास देत आहे. त्यामुळें मानवी इतिहास हा वर्गयुद्धाप्रमाणें वर्गसहकार्याचा इतिहास आहे असें आपणांस दिसून येतें. ज्या वर्गीय विचारावर साम्यवादी शिक्षणाचें तत्त्वज्ञान उभारलें आहे तो वर्गीय विचार वरील ऐतिहासिक दृष्टीनें तर एकांगी आहेच परंतु त्यांत आणखी एका दृष्टीनें दोष आहे. साम्यवादी तत्वज्ञानाप्रमाणें वर्गीय संघर्षच आतांपर्यंतच्या सामाजिक विकासाचें एकमेव कारण होते असें मानलें तर, वर्गविहीन समाजाचें भवितव्य काय होणार ? त्या अवस्थेमध्यें वर्गयुद्ध नष्ट झालेले असेल. वर्ग–संघर्षाबरोबर मानवी प्रगति देखील त्यामुळें कायमची

थांबणार काय? वर्गीय विचारांतील हा दोष उपेक्षणीय आहे असें मानतां येणार नाहीं.

साम्यवादी शिक्षणाचे तत्त्वज्ञान वर्गीय विचारावर अधिष्ठित असल्यामुळें या संघर्षप्रिय विचारांतून मानवी सहकार्याचा उदय अशक्यप्राय होऊन बसेल आणि शिवाय ज्या गृहीतकृत्यावर तत्त्वज्ञानाचा हा डोलारा उभारला आहे तें गृहीतकृत्यच सदोष असल्यामुळे त्या तत्त्वज्ञानाचे स्थैर्य देखील शंकास्पदच आहे.

## भांडवलशाही राष्ट्रांतील शिक्षणविषयक तत्त्वज्ञान

परंतु भांडवलशाहीप्रधान राष्ट्रांत वरील शिक्षणाचें तत्त्वज्ञान अंगिकारलें जात नाहीं. स्पर्धा हें त्याच्या तत्त्वज्ञानाचें केंद्र आहे. त्याच्या शिक्षणाच्या तत्त्वज्ञानानें मुख्यतः एकोणिसाव्या शतकांतील विचारतत्त्वाचा वारसा घेतला आहे. गेल्या शतकांत मुक्त वा अनिर्बंध स्पर्धा हें त्याचें जीवनाचें तत्त्वज्ञान होतें. स्पेन्सरने आपलें सारे विचार या तत्त्वाभोंवतीं विणलेले आहेत. असें म्हणण्यांत येतें कीं, स्पेन्सरमुळेंच त्या शतकांत हें तत्त्वज्ञान अवतरलें. खरा प्रकार मला वाटतें उलटा आहे. या कालखंडांतील या स्पर्धाप्रधान तत्त्वज्ञानामुळे स्पेन्सरच्या विचारांचा जन्म झाला. याचा अन्योन्यसंबंध कसाही असो. इतकें खरें कीं, आजच्या लोकशाही राष्ट्रांतील चुरशीवर आधारलेलें शिक्षणविषयक तत्त्वज्ञान एकोणिसाव्या शतकांतील आहे. वरील मुक्त स्पर्धा अद्याप संपूर्णतः शैक्षणिक क्षेत्रांतच शिल्लक राहिलेली आहे. आर्थिक व्यवहारांत पूर्वीची खुली स्पर्धा आतां राहिलेली नाहीं. तीवर बरींच बंधनें पडलेलीं आहेत. राजकीय क्षेत्रांत 'पोलीस राज्याची' कल्पना अस्तंगत होत चालली असून 'लोककल्याणकारी राज्याची' कल्पना वरील दोन्ही क्षेत्रात आपला ठसा उमटवीत असल्यानें वरील स्पर्धेचें तत्त्वज्ञान सर्वस्वी नसलें तरी बरेंच संकोच पावलेलें आहे. परंतु ज्याच्यावर अद्याप आजच्या काळाची सांवली पडलेली नाहीं असें मागच्या शतकांतील एकच तत्त्वज्ञानाचें क्षेत्र आहे कें तें म्हणजे आमचें शिक्षणविषयक तत्त्वज्ञान होय.

चुरस हाच अद्याप भांडवलशाही राष्ट्रांतील शिक्षणाचा पाया आहे. जाणतेपणें वा अजाणतेपणे चढाओढीला उत्तेजन दिले जातें. वर्गांमध्यें, परीक्षा-पद्धतीमध्यें चुरशीवर सर्व भर दिला जातो. परीक्षेंत जो पहिला क्रमांक मिळवील त्याला मानाचीं बक्षिसें दिलीं जातात. हाच नियम विद्या-पीठांच्या उच्च परीक्षाना लावला जातो. पहिल्या एक अगर दोन विद्या-र्थ्यांना पारितोषिके वांटलीं जातात. त्यामुळे काहीं विद्यार्थी उत्साहाने या स्पर्धेत भाग घेतात. परंतु पुष्कळसे विद्यार्थी या वाटेला जात नाहींत. या चढाओढींत आपण उतरणार नाहीं याची त्याना जाणीव असते त्यामुळें बक्षिसाची प्रेरकशक्ति ( incentive ) त्यांना उपयुक्त ठरत नाहीं. हाच प्रकार क्रीडा-नैपुण्याच्या बाबतींत होतो. खेळामध्य कौशल्य दाखविणाऱ्या एखाद्या क्रीडा-पटूला बक्षिस दिलें जाते. चढाओढीमध्ये पट्टीचे खेळाडू असल्यामुळें सामान्य विद्यार्थी त्यांत भाग घेत नाहींत. त्यात त्याची हवी तेवढी प्रगति झालेली नसते. शिवाय त्याना न्यूनगडाने पछाडलेलें असतें. अशा परिस्थितींत बहुसंख्याक विद्यार्थी क्रीडा-क्षेत्राकडे वळत नाहींत खेळ हें थोड्या विद्यार्थ्यांचे व्यायामाचें क्षेत्र बनते सर्वांची शारीरिक उन्नति हें ध्येय हस्तगत होत नाही. चारशेंपैकीं चारच विद्यार्थी या स्पर्धेच्या चौकटींत असतात बाकीचे विद्यार्थी नेहमींच्या ' राजमार्गाने ' जातात अशावेळीं वरील शैक्षणिक प्रगति वा व्यायामविषयक विकास ही थोड्या विद्यार्थ्यांची मक्तेदारी बनते. कुठल्या नियमामुळे नव्हे तर काहीं अटळ शिक्षणविषयक सिद्धांतामुळे हें घडतें.

या स्पर्धाप्रधान शिक्षणामुळे थोड्यांची अप्रतिहतपणे प्रगति होते ही गोष्ट शंकातीत आहे. परतु तक्रार आहे ती याहून गभीर स्वरूपाची ! या शाळेतील सर्व कार्यक्रमातून विद्यार्थ्यांच्या मनावर सस्कार केले जातात ते सगळे स्पर्धाप्रधान ! त्यामुळे त्याची मनःप्रवृत्ति बनते ती याच एका चौक-टीला अनुकूल. त्यामुळे त्यांचे शैक्षणिक अधःपतन होते ही तर खेदकारक घटना आहेच, परंतु त्याहूनही दुःखदायक कोणती गोष्ट असेल तर ती त्यांची होणारी मानसिक हानि ! चुरशीचे बाळकडू त्यांना शाळेंत मिळाल्यामुळें समाजांत वावरतांना ते त्याच प्रवृत्तीने वावरतात. अर्थात् ही चढाओढ

म्हणजे सहकार्याचा अभाव हें सागावयाला नकोच ! कारण संघर्ष म्हणजे सर्वांमध्ये चालू असलेली प्रत्यक्ष, अप्रत्यक्ष लढाई असते. युद्धामध्ये दोन प्रतिस्पर्धी परस्परांशीं सहकार्य कसले करणार ? तेथें शत्रूवर मात करणें हाच न्याय व हाच नियम असतो अशामुळें या शाळातून बाहेर पडणारे विद्यार्थी मानसशास्त्रदृष्ट्या सहकारी जीवनाला अपात्र ठरलेले असतात. ही मानसिक घडण सहकारी आयुष्याशीं असहकार करणारी आहे. आजच्या शिक्षणातील स्पर्धेवरील भर यासाठीं बदलला पाहिजे. बर्ट्रांड रसेल यांनी शिक्षण-विषयक तत्त्वज्ञानाची छाननी आपल्या Education and Social Order या ग्रथांत फार सुदर रीतीने केलेली आहे. ते म्हणतात, " What the world now needs is not competition but organization and co-operation All belief in the utility of competition has become an anacronism... .. The conception of society as an organic whole is very difficult for those, whose minds have steeped in competitive ideas. Ethically, therefore no less than economically it is undesirable to teach the young to be competitive." (Education and Social order P 177.)

## शिक्षणपद्धतींत राष्ट्रवादाचें स्थान

स्पर्धाप्रधान विचाराचा आणखी एक आविष्कार म्हणजे आमचा राष्ट्रवादी विचार होय ! स्पर्धा ही व्यक्तीप्रमाणे राज्यात असू शकते. या राज्यांतील चढाओढ यशस्वी करण्यासाठीं विद्यार्थ्यांच्या बालमनावर देश-भक्तीचे अवास्तव महत्त्व ठसविले जाते शाळेत इतिहास शिकवितांना देखील आपल्या देशातील पराक्रमी पुरुषाचा फाजील गौरव केला जाऊन अन्य देशांतील शूर योद्धयाचा यथोचित शब्दात देखील उल्लेख केला जात नाहीं. हा राष्ट्रवादी दृष्टिकोन दोन राज्याच्या स्पर्धेत टिकण्यासाठी बुद्धि-पुरस्सर शिकविला जातो. परतु या स्पर्धाप्रधान तत्त्वज्ञानाशिवाय हा राष्ट्र-वादी विचार इतर दृष्टीनें देखील विघातक ठरल्यावांचून राहत नाहीं. माझा देश तेवढा मोठा, माझ्या मातृभूमींत जन्मलेले पुरुष तेवढे श्रेष्ठ, माझ्या देशाचें ध्येय तेवढें भव्य आणि उदात्त आणि इतर राज्यांचें मोठेपण,

त्यांचे पुरुष, त्यांचीं ध्येयें हीं तुलनात्मक दृष्ट्या हिणकस अशी शिकवण कळत न कळत अशा शाळांतून दिली जाते. अशा संस्कारांमुळें दोन देशांमध्यें सहकाराऐवजी विद्वेष आणि स्पर्धा वाढण्याचा संभव अधिक आहे. शिक्षणपद्धतींतून या राष्ट्रवादी विचाराचें निर्मूलन शक्य तितक्या त्वरित झालें पाहिजे. हाच विचार बर्ट्रांड रसेल यांनीं त्याच्या Education and the Social Order मध्यें प्रभावी रीतीनें मांडला आहे ते म्हणतात, ' They ( boys and girls ) are taught false history, false politics, false economics. They are informed of the misdeeds of foreign states but not of the misdeeds of their own state. They are led to suppose that all the wars in which their own State has engaged are wars of foreign States and wars of aggression. They are taught to believe that when, contrary to expectation, their own country does conquer some foreign country, it does so in order to spread civilization or the light of the gospel, or a lofty moral tone, or prohibition or something which is equally noble." (Education and Social order, P. 137.)

## सहकार्याचें निकोप शिक्षणविषयक तत्त्वज्ञान

सहकार्यवादी तत्त्वज्ञान आजच्या शिक्षणाचें केंद्रस्थान असलें पाहिजे हें तत्त्व प्रतिपादन करणें सोपें आहे. परंतु त्याची अंमलबजावणी करणें फार कठीण आहे. कारण तें प्रत्यक्षांत आणावयाचें म्हणजे काय करावयाचें हें अद्यापही कोणा समाजशास्त्रज्ञानें वा शिक्षणतज्ञानें सांगितलेलें नाहीं. मोठमोठे तत्त्ववेत्ते या भागाला स्पर्श करूं लागले म्हणजे त्यांची लेखणी दुबळी आणि निस्तेज वाटूं लागते. तिच्यांतील पूर्वीचा जोम कमी होऊं लागतो. तरी देखील या सहकार्यवादी शैक्षणिक तत्त्वज्ञानाची ढोबळ मानानें चर्चा करण्यात फारसा अडथळा येत नाहीं. अशाच तऱ्हेनें स्थूल रूपरेषा देण्याचा येथें नम्र प्रयत्न केलेला आहे.

आमच्या शिक्षणक्रमांत सहकार्याचा शिरकाव व्हावयाचा म्हणजे प्रथम आमची परीक्षा-पद्धति आमूलाग्र बदलली पाहिजे. आज शाळेंत वा

विद्यापीठांत पहिल्या कांहीं क्रमांकांना पारितोषिकें दिलीं जातात. ती प्रथा एकदम बंद पडली पाहिजे. परतु बक्षिसाची ही प्रेरकशक्ति नष्ट झाली तर विद्यार्थी अभ्यासप्रवण होणार कसे हा प्रश्न आहे. त्यासाठीं निराळ्या मार्गाचा अवलंब करावा लागेल. सहकारी जीवनामध्ये जो संघ जास्तींत जास्त प्रगति करील त्याना गौरवाची प्रशस्तिपत्रें वा बक्षिसे दिलीं पाहिजेत. विद्यार्थ्यांमध्ये देखील ही प्रवृत्ति अधिक प्रकर्षाने दिसून आल्यास त्याला खास बक्षिसे दिलीं पाहिजेत. परंतु मुख्य बदल या उत्तेजनाच्या दृष्टीत झाला पाहिजे. प्रोत्साहन स्पर्धेला नसून सहकार्याला आहे एवढा सामान्य नियम लक्षांत ठेवला कीं त्याप्रमाणे सर्व हालचाली नियत्रित करतां येतील.

दुसरा बदल मुलाच्या अभ्यास–पद्धतींत करता येईल. आज प्रत्येकजण अलगपणें आपल्या विषयाचा अभ्यास करतो. त्यामुळे मी माझ्या सघापैकीं एक ही भावना प्रबल होत नाहीं. यासाठीं सहकार्यानें अभ्यास करण्याची सवय विद्यार्थ्यांना लावली पाहिजे. परतु अशा सवयी कशा निर्माण करावयाच्या ? याबाबत एक प्रत्यक्ष उदाहरण घेऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल. समजा, एखाद्या वर्गामध्ये मराठी काव्याचा अभ्यास परीक्षेसाठीं नेमला आहे. या आधुनिक काव्याचा अभ्यास सहकारी पद्धतीने करणे शक्य आहे. या विद्यार्थ्यांमध्ये या विषयाची वांटणी करता येईल. त्याच्यापैकीं काहींजणांना केशवसुताच्या बडाची ‘ तुतारी ’ फुकावयाला सागता येईल. काहीं जणांना बालकवींचें निसर्गप्रेम लुटावयाला सागता येईल. कांहींना ताम्यांचा नर्म-शृंगार किंवा प्रसन्न कौटुंबिक गीतें अभ्यासासाठीं देतां येतील. त्यातील कांहीं-जणाना माधव ज्यूलियनच्या प्रेमाची खुमारी लक्षपूर्वक घेण्यास सागता येईल. इतराना मर्ढेकर, अनिल किंवा पु. शि. रेगे याच्या नव्या सांप्रदायातील सौंदर्य-स्थळे शोधण्याच्या उद्योगाला लावता येईल. अशा तऱ्हेनें निरनि-राळ्या विद्यार्थ्यांनीं निरनिराळ्या ठिकाणचें सौंदर्य–कण गोळा केले म्हणजे सहकारी प्रवृत्तीनें ते त्याना परस्पराना देता येतील. एक दुसऱ्याला आपली टिपणे देईल व त्याच्याकडून दुसरे मुद्दे घेईल. या पद्धतीनें सर्वांचा या काव्याचा अभ्यास होईल व तो देखील सहकार्याच्या, खेळीमेळीच्या

भूमिकेवरून ! अशा तऱ्हेची पद्धति अंगिकारली तर मुख्यतः सहकार्याची भावना मुलांमध्ये निर्माण होईल. तीच त्यांना पुढच्या आयुष्यांत उपयोगी पडेल.

वरील दोन्ही बदलांप्रमाणें मुख्यतः कसें शिकवावें याचा उल्लेख केला. परंतु कसे शिकवावे याबरोबर काय शिकवावें हाही प्रश्न चर्चिला पाहिजे. याबाबत एक उदाहरण देऊन हा मुद्दा स्पष्ट करता येईल. आजच्या शिक्षण-क्रमात स्पर्धेला अवास्तव महत्त्व आहे हें वर आलेच आहे. आमचा इति-हास शिकविताना देखील युद्धे, महायुद्धे, जागतिक युद्धे यानाच फाजील प्राधान्य मिळालेले असतें. सीझर, नेपोलिअन, चंगीझखान या तलवारबहा-द्दरांना ( war mongers ) अकारण महत्त्व दिलेले असते. त्यांतून पुन्हां एका देशाचा दुसऱ्या देशाशीं झालेला झगडा सुरस भाषेंत वर्णिलेला असतो. या इतिहासाच्या शिकवणीमुळे स्पर्धेची भावना दृढावली जाते. त्याऐवजीं इतिहास शिकवितांना देखील सहकार्याच्या भावनेला श्रेष्ठत्व देणे शक्य आहे. सीझर अगर नेपोलियन याच्यापेक्षा गौतम बुद्ध, सॉक्रेटीस कन्फ्यूशिअस, येशू ख्रिस्त, याच्या जीवनावर भर देता येईल. त्यानीं दिलेली प्रेमाची शिकवण वर्णिता येईल किंवा गॅलिलिओ, न्यूटन, डार्विन, आइन्स्टाइन याच्यासारखे शास्त्रज्ञ यांचीं चरित्रे अधिक अभ्यासता येतील. कारण शास्त्रज्ञाच्या ज्ञानाला राष्ट्रवादाचा वास येत नाहीं. इतिहास शिक विताना अशा दृष्टिकोनातून रचना केली तर ही सहकारी प्रवृत्ति निर्माण व्हावयाला मदत होईल. याप्रमाणे या नव्या शिक्षणपद्धतीसाठीं आणखी काहीं सूचना करता येतील. परंतु मुख्य प्रश्न आहे तो त्यांतील बारीक-सारीक गोष्टी वर्णन करण्याचा नाहीं, दिशा ठरविण्याचा आहे. ही दिशा वरील चर्चेंतून सूचित झालेलीच आहे. आपला हेतु तींतच पुष्कळसा साध्य झालेला आहे.

## विकेंद्रित लोकसत्तेचें स्वरूप

व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें आतांपर्यंत अर्थव्यवस्था, पक्षराजकारण आणि शिक्षणाचें तत्त्वज्ञान यांचा विचार केला आणि व्यक्तिस्वातंत्र्याचें शाश्वत

मूल्य जोपासण्यासाठीं सहकारी अर्थव्यवस्था, पक्षनिरपेक्ष राजकारण आणि शिक्षणाचे नवे निरामय सहकारी तत्त्वज्ञान यावर आपणास आपले लक्ष केंद्रित केले पाहिजे हें पाहिलें. परतु वरील विचाराबरोबरच समाजाच्या सर्वच अंगाना सामावून घेणाऱ्या आजच्या राज्य सरकारचे स्वरूप काय असावें याचाहि विचार आपण केला पाहिजे. ही चर्चा अत्यंत आवश्यक आहे. कारण वरील सर्व विचाराशीं राज्याचे स्वरूप जर सुसवादी नसेल तर व्यक्तिस्वातत्र्याचे मानवाचें स्वप्न साकार होण्यात मोठीच अडचण निर्माण होण्याचा सभव आहे.

आजच्या राज्याचे ठळक लक्षण म्हणजे अमाप सत्ताकेंद्रीकरण हें सागता येईल. प्राचीन किंवा मध्ययुगामध्यें कधींही नव्हती इतकी आजची राज्यसत्ता बलशाली झाली आहे. याला मुख्यतः तीन कारणें सागता येतील.

(१) तत्रविद्येमधील झपाट्याने झालेली प्रगति.
(२) राजकीय क्षेत्रात उदयाला येणारी लोकराज्याची कल्पना.
(३) आर्थिक धोरणाला समाजवादी अर्थव्यवस्थेचें लाभत असलेलें अधिष्ठान.

## तंत्रविद्येमुळें राज्यसत्ता बलशाली

तंत्रविद्येच्या विकासाला प्रारंभ होऊन उणीपुरी दोन शतकें देखील झाली नाहींत; परंतु एवढ्या अल्पकाळात या तत्रविद्येने केलेली प्रगति आश्चर्यकारक आहे. या तत्रविद्येच्या विकासामुळे समाजजीवनावर काय परिणाम झाला असेल तो असो, त्यामुळे आजचें राज्यसरकार मात्र बरेंच बलशाली बनलें आहे यात शकाच नाहीं. तत्रविद्येमधील देखील काहीं चार गोष्टीच राज्यसरकारच्या हातात सत्ता केंद्रित करावयाला उपयोगी ठरल्या :

(१) दळणवळणाचीं साधनें.
(२) प्रचाराचीं साधनें.

(३) उत्पादनाचीं साधनें.

(४) विध्वंसक साधनें.

तंत्रविद्येमधील नव्या ज्ञानाच्या साधनामुळें आज शंभर 'उंबरा' असलेल्या छोट्या खुर्दवाडीपर्यंत देखील चांगल्या सडका तयार झाल्या आहेत. मोटारी, आगगाड्या, विमानें, आगबोटी इत्यादि दळणवळणाचीं साधनें सर्व देशभर सचारास साहाय्यभूत झालीं आहेत. त्यामुळें मध्यवर्ति सत्तेचे हात कोणत्याही 'खुर्द' वाडीस सहज लीलेने पोहोचूं शकतात.

देशाच्या कानाकोपऱ्यात लोकाच्या यादवी युद्धाचा उठाव झाला तर या वाहतुकीच्या साधनाच्या द्वारे थोड्या तासातच त्याचा समाचार घेतां येतो.

त्याचप्रमाणे रेडियो, वृत्तपत्रे याच्या शोधांमुळें व प्रसारामुळे शासनसत्ता आपल्या विचारांचा फैलाव झपाट्याने करूं शकते. कांहीं देशामधून तर त्यांच्याच जोरावर जनतेचीं मते विशिष्ट विचाराने भारून टाकण्याचें कार्य सरकार करूं शकते. वरील दोन्ही साधनाना उत्पादनाच्या प्रचड साधनानीं चांगलाच हातभार लावला आहे. आज मोठ्या प्रमाणावर धरणे बांधणें, कालवे, वीज उत्पन्न करणे, इत्यादि गोष्टी या तत्रविद्येच्या जोरावर सहज साध्य झाल्या आहेत. राज्याकडे जर या उत्पादनाचा ताबा गेला तर तेथें आर्थिक, राजकीय आणि सामाजिक सत्तेचें केंद्रीकरण व्हावयाला कितीसा वेळ लागणार ?

आणि या वरील तिन्ही तत्रविद्येमधील शोधाना विध्वंसक शास्त्रांचा पाठिंबा मिळाल्यामुळें सत्ताकेंद्रीकरणाला अधिकच बळकटी आली आहे. रणगाडे, बॉम्ब या युद्धसाहित्याच्या जोरावर मध्यवर्ति सरकार जनतेचा कोणताहि उठाव चुटकीसरशी दडपून टाकू शकतें. परंतु ॲटम बॉम्ब किंवा हैड्रोजन बॉम्ब यांच्यामुळें जर राज्ययत्रणेचे हात अधिकच बळकट झाले आहेत. पन्नास वर्षांपूर्वी कांहीं थोडे क्रातिकारक शस्त्रास्त्रांच्या जोरावर रशियामधील झार सरकार उलथून टाकूं शकत होते. आता ही शक्यता

प्रगतच नव्हे तर आशियामधील अप्रगत देशामध्ये देखील नष्टप्राय झाली आहे. तंत्रविद्येतील शोधामुळे राज्यसरकारच्या स्वरूपांत झालेला हा बदल व्यक्तिस्वातंत्र्याच्या दृष्टीनें महत्त्वपूर्ण मानला पाहिजे.

यंत्रयुगामधील वरील शोधामुळे समाजजीवनावर काहीं इष्ट परिणाम झालेच नाहींत असें मला सूचित करावयाचे नाही. परतु राज्यकारभारावर त्याचे जे परिणाम झाले त्याचा परामर्ष घेतांना सरकारजवळ अपरिमित सत्ता केंद्रित झाली आहे एवढेच ध्वनित करावयाचे आहे.

## लोककल्याणकारी राज्यामुळें सत्ताकेंद्रीकरणाकडे कल

तंत्रविद्येमधील प्रगतीप्रमाणे लोककल्याणकारी राज्याच्या उदयामुळें आजचें शासनविषयक धोरण हळुहळू बदलत चालले आहे. त्यामुळें राज्यसरकार बलसपन्न होण्यास हातभार लावला जात आहे इसवी सनाचा अठराव्या शतकाच्या अतापर्यंत राज्याचे कार्यक्षेत्र मुख्यतः अंतर्गत शातता, सुव्यवस्था व देशाचे परचक्रापासून सरक्षण एवढ्या पुरतेच मर्यादित होते परतु पुढें औद्योगिक क्रांति, एकोणिसाव्या शतकातील मुक्तस्पर्धेवर आधारलेली भाडवलशाही अर्थरचना आणि लोकसत्तेच्या प्रगत कल्पना यांमुळे वरील 'पोलीस राज्या च्या कल्पनेत उत्क्राति होऊं लागली. खुल्या स्पर्धेच्या तत्त्वज्ञानामुळें भांडवलदारानीं कारखान्यांत व गिरण्यात लहान बालकें, गरोदर स्त्रिया वृद्ध पुरुष याना देखील निर्दयपणे बारा बारा तास गलिच्छ जागेंत राबवून घ्यावयाला सुरुवात केली. आणि इतकेंही करून अपुऱ्या वेतनामुळे होणारी उपासमार, वृद्धापकाळातील दैन्य, आजाराच्या वेळीं जवळ पैसा नसल्यामुळें पत्करावा लागणारा मृत्यु यासारखे दारुण प्रसग त्यांच्यावर कोसळू लागले. तेव्हां त्या समाजव्यवस्थेमधील हे दोष कमी करून व्यक्तीला जीविताची कमीतकमी शाश्वति मिळावी म्हणून राज्यसरकार कायदे करूं लागले. इंग्लड-मधील फॅक्टरी ॲक्ट, सक्तीचे प्राथमिक मोफत शिक्षण, स्त्रियांना बाळंत-पणाची हक्काची रजा, लहान मुलांना गिरण्यात व कारखान्यांत राबवि-ण्यास मनाई इत्यादि अशाप्रकारच्या कायद्याचा उल्लेख करतां येईल. राज्यानें केवळ शाततासुव्यवस्थेची हमी न घेतां व्यक्तीच्या कल्याणासाठीं कांहीं कायदे करावे व योजना आखाव्या या कल्पनेचा उगम या

काळात झाला. पुढें तिला इ. स. १९१४-१८ चे पहिलें महायुद्ध, इ.स. १९२९ ची जागतिक मदी व इ. स. १९३९-४५ चें दुसरें जागतिक युद्ध यामुळे चालना मिळाली आणि आज पोलीस राज्याची कल्पना आस्ते आस्ते विरून जाऊन लोककल्याणकारी राज्याची कल्पना दृढमूल होत आहे. अन्न, वस्त्र, निवारा, वैद्यकीय मदत आणि शिक्षण या मानवी जीवनामधील कमीत कमी गरजा भागविण्याचे उत्तरदायित्व आज राज्याने देखील अशतः मान्य केले आहे. कुटुबातील पित्याचें जें स्थान, तेच समाजातील राज्याचें स्थान अशी कल्पना हळुहळूं लोकप्रिय होऊ लागली मातेच्या उदरातील गर्भावस्थेपासून तो मृत्यूपर्यंत सर्व अवस्थातील सर्व काळजी राज्यसरकारने आपल्या शिरावर घ्यावी हा विचार राजमान्य आणि लोकमान्य झाला आहे.

परंतु लोककल्याणाच्या या नव्या विलोभनीय कल्पनेबरोबर राज्यसरकारचे कार्यक्षेत्र विस्तारत चाललें आहे. आरोग्य, शिक्षण, आर्थिक सुरक्षितता या सबधाच्या विविध योजनामुळे सरकार नवीं कामे आपल्या अंगावर घेत असलें तरी त्याप्रमाणात ते स्वतःकडे सत्ताही केंद्रित करीत आहे इतर स्थानिक सस्था किंवा समाज संस्थांची या क्षेत्रातील स्वायतत्ता कमी होऊन शासनयत्र केंद्रीकरणाकडे झुकत चालले आहे. केंद्रीकरणामुळे काहीं दृष्ट्या इष्ट परिणाम होत असले तरी दूरगामी दृष्टीनें पाहता समाजजीवनावर त्याचे घातक परिणाम होण्याचा संभव जास्त आहे. सामर्थ्यसपन्न मध्यवर्ति सरकार व्यक्तिस्वातत्र्याशीं सुसंवादी असू शकत नाहीं. त्यामुळे लोककल्याणाबरोबर व्यक्तिमत्वाचा विनाश होण्याचा सभवही मोठा असतो. शिवाय स्वतःवर अवलबून राहून सर्व कारभार हाकण्याच्या व्यक्तीच्या सवयी ( self-reliance ) अशा राज्यात बहरल्या जाण्याचा संभव अगदीं क्वचितच असतो.

## समाजवादी अर्थव्यवस्था सत्ताकेंद्रीकरणाला साहाय्यभूत.

लोककल्याणाच्या राज्यकारभाराविषयक कल्पनेप्रमाणें अर्थशास्त्रांत देखील समाजवादी अर्थव्यवस्था जनमनाची पकड घेत आहे. नियोजन हें समाजवादी अर्थव्यवस्थेचें अंगभूत लक्षण असतें. देशामधील उत्पादनाचीं प्रचंड

साधनें हीं राज्यानें आपल्या ताब्यात घेतलीं तर त्यामुळें देशाचें उत्पन्न वाढेल व त्यावर गरीब जनतेला जीवनाच्या कमीतकमी गरजा भागवितां येतील असा या अर्थव्यवस्थेमागील मूळ हेतु आहे. यामुळे वीज, धरणें, कालवे इत्यादीसबधीं मोठमोठ्या योजना आता राज्यसरकारने हातीं घ्याव्या असें अनेक वेळीं बोलून दाखविले जाते. त्यानुसार काहीं ठिकाणीं नियोजन देखील तयार केलें जात आहे.

या समाजवादी अर्थव्यवस्थेमुळे देशातील बेकारीचा प्रश्न अल्पाशानें सुटण्याची शक्यता आहे. नागरिकाचे जीवनमान उंचावणे स्वाभाविक आहे. आर्थिक दृष्ट्या मेटाकुटीला आलेल्या दरिद्री नारायणाला या अर्थव्यवस्थेमुळें सुखाचा घास मिळण्याचे आश्वासन मिळणार आहे.

परंतु याहिबाबत राज्यसरकार अन्नाचा प्रश्न सोडवून व्यक्तिस्वातत्र्याचा प्रश्न उपस्थित करीत आहे. वरील नियोजनामुळे उत्पादनाच्या साधनाची मालकी राज्यसरकारकडे जाते. त्यामुळे उत्पादन केव्हा आणि किती करावयाचे, त्याचें विभाजन कसे करावयाचे या संबधीचे सर्व निर्णय राज्य सरकारच घेते. राज्यसस्थेच्या हातीं केंद्रित होणारी ही मुबलक आर्थिक सत्ता समाजजीवनावर दूरगामी परिणाम केल्यावाचून राहणार नाहीं. कारण आर्थिक नियत्रण हे समाजजीवनाच्या फार मोठ्या अगाचे नियत्रण असतें.

अशा राज्यामध्ये भाकरीच्या मोबदल्यामध्ये नागरिकाना आपल्या मेंदूची जबर किमत द्यावी लागते. आणि मेंदूची किमत दिली म्हणजे मानवी स्वातंत्र्य आणि मानवी सस्कृति यासबंधीं विचार करण्याचे प्रयोजन उरत नाहीं.

तंत्रविद्येमधील अप्रतिहत प्रगति, लोककल्याणकारी राज्य आणि समाजवादी अर्थव्यवस्था यामुळें राज्यसंस्थेकडे अमर्याद सत्तेचें केंद्रीकरण होत चाललें आहे आणि एका बिंदूमध्ये सर्व सत्ता गोळा करणारी बलिष्ठ सरकारी यंत्रणा व्यक्तिस्वातंत्र्याशीं उभा दावा माडल्याशिवाय राहणार नाहीं हें इतिहासानें आतांपर्यंत अनेक वेळां सिद्ध केलें आहे.

## विकेंद्रित अर्थव्यवस्था

वरील आक्रमणापासून व्यक्तिस्वातंत्र्याचें संरक्षण कसें करावयाचें असा प्रश्न आजच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या हितचिंतकांपुढे पडला आहे. या आपत्तींना तोंड देण्याचे सामर्थ्य एखाद्या तत्त्वचिंतकाच्या विचारांत आहे कां? विकेंद्रित लोकसत्तेची कल्पना या समस्याना तोंड देऊं शकेल असे वाटते.

यंत्रयुगामध्यें आज युरोप अमेरिकेसारख्या प्रगत देशांत आणि आशिया-मधील अप्रगत देशांत देखील सत्तेचे केंद्रीकरण होत आहे. यासाठीं प्रचंड प्रमाणावर उत्पादन करणाऱ्या साधनावरच नियंत्रण घालण्याची गरज भासूं लागली आहे. अत्यंत मोठ्या प्रमाणावर धरणे बांधून आणि कालवे काढून उत्पादनक्षमता वाढत असेल. परंतु त्याबरोबर इतर गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण होत आहेत. म्हणून ही उत्पादनाचीं साधने आपण लहान प्रमाणावर वापरलीं पाहिजेत. प्रचंड धरणयोजनेपेक्षा लहान लहान धरणे बांधून कालवे काढावे. वीज निर्माण करण्याचा एखादाच अत्यंत मोठा कारखाना काढण्यापेक्षा तेवढीच वीज दहा ठिकाणीं निर्माण करण्याची योजना आखली पाहिजे. हजारो मजूर राबतील एवढा मोठा कापड कारखाना एकाच ठिकाणीं काढण्यापेक्षां तेवढेंच कापड काढण्यासाठी अनेक लहान लहान यंत्रें वापरलीं पाहिजेत.

अपरिमित दारिद्य आणि अमर्याद अज्ञान असलेल्या अप्रगत आशिया-मधील देशामध्यें ही विकेंद्रित अर्थव्यवस्था कितपत व्यवहार्य ठरेल याबद्दल शंका वाटणे स्वाभाविक आहे. कारण येथे द्रुतगतीनें उत्पादन वाढवून लोकांची आर्थिक दुरवस्था झपाट्यानें कमी करणें हा खरा प्रश्न आहे. या प्रश्नासाठीं कालमर्यादा फार मोठी असून चालणार नाहीं अशा स्थितींत या लहान लहान उद्योगधंद्यापेक्षां पाश्चात्य देशांतील महायंत्रोत्पादनच या गरिबीशीं लढा देण्यांत यशस्वी होणार आहे. लहान उद्योगधंद्याचा मार्ग लांबचा आहे. परंतु ही कालमर्यादेची अडचण लक्षांत घेऊनसुद्धां व्यक्ति-स्वातंत्र्याच्या संवर्धनाच्या दृष्टीने विकेंद्रित अर्थव्यवस्थाच आपणांस पसंत करावी लागेल. त्याला दुसरा पर्याय आज तरी दिसत नाहीं

विकेंद्रित अर्थव्यवस्थेमुळें दुसऱ्या दृष्टीनेंही व्यक्तिविकासाला मोठें साहाय्य होणार आहे. अवाढव्य प्रमाणावर उत्पादन करणाऱ्या प्रचंड यंत्रा-मुळें अगर कारखान्यामुळें माणसाच्या व्यक्तित्त्वावर फार वाईट परिणाम होतो. त्या प्रचंड अक्राळविक्राळ यंत्राच्या भाराखालीं माणसाचें व्यक्तित्त्व चिरडून जातें. त्या यंत्राचे आपण घटक आहोंत असें वाटू लागून त्याला आपल्या स्वतंत्र व्यक्तित्त्वाचाहि विसर पडावयाला लागतो. अमर्याद सागरां-तील क्षुद्र बिंदूप्रमाणे आपण आहोंत ही कल्पना मूळ धरू लागते. माणसाची अस्मिता जर अशा प्रचड उत्पादन साधनांमुळें नष्टप्राय होत असेल तर तो अत्यत घातुक परिणाम मानला पाहिजे. हा अनिष्ट परिणाम यत्रयुगामुळें युरोपप्रमाणें आशियामध्ये आणि इतरत्रहि सगळीकडे दृष्टोत्पत्तीस येतो. परतु प्रगत युरोपपेक्षां औद्योगिक दृष्टया मागासलेल्या आशियाई देशांत या महायंत्रोत्पादनामुळें अधिकच गुंतागुंतीचे प्रश्न निर्माण होत आहेत. या प्रश्नांचें स्वरूप सामान्यतः दुहेरी आहे.

## अप्रगत देशांतील महायंत्रोत्पादनामधील अडचणी

एकतर अशा महायंत्राच्या उत्पादनासाठीं अक्षरशः कोट्यवधि रुपये लागतात. एवढें मोठें भांडवल हीं राष्ट्रे कोठून उभे करणार ? कोणाकडून कर्ज घ्यावयाचें ठरविलें तरी एवढ्या मोठ्या प्रमाणावर कर्ज तरी कोण देणार ? आणि दुसरें असें कीं असें यंत्रोत्पादन सुरू झालें तर बेकारीला जो बहर येईल त्याला तोंड कसें देणार ? या उत्पादनपद्धतीमुळें शंभर मजुरांचें काम दहा मजुरांकडून होणार, बाकीच्या नव्वद मजुरांनीं बेकारी-तच जिणें कंठावयाचें कां ? युरोपमध्यें मनुष्याची श्रमशक्ति कमी आणि पैशाची शक्ति मोठी आहे. या मागासलेल्या देशात परिस्थिति उलटी आहे. येथें मनुष्यबळ अत्यत मोठ्या प्रमाणावर आहे व आर्थिक बळ फार कमी प्रमाणावर आहे. येथें यंत्राचा उपयोग कसा करावा यापेक्षां लाखों बेकारां-ची श्रमशक्ति उपयोगांत कशी आणावी हा प्रश्न आहे. त्यासाठीं जपान-प्रमाणें छोटया छोटया यंत्राचा शोध लावून वरील दोन्ही प्रश्न सोडविले पाहिजेत.

एकाच गिरणींतून दररोज हजारों वार कापड काढण्यापेक्षां विजेच्या साहाय्यानें दहा दहा माणसे हातमाग चालवितील अशी छोटीं उत्पादनाचीं यंत्रें शोधून काढलीं पाहिजेत. अशा लहान यंत्रामुळे कार्यक्षमतेवर परिणाम होईल. परतु कार्यक्षमता हे आपलें ध्येय नाहीं, तें साधन आहे. लोकसत्ता किंवा व्यक्तिविकास हे आपले साध्य आहे. या ध्येयाच्या ताऱ्याकडे सदैव लक्ष ठेवूनच आपणांस आपली वैचारिक वाटचाल केली पाहिजे अशा छोटया उद्योग–धद्यामुळें सत्तेचें विकेंद्रीकरण होईल आणि व्यक्तींमधील अस्मिता सदैव जागृत राहील.

## विकेंद्रित लोकसत्तेचें अधिष्ठान–स्थानिक स्वराज्य संस्था

यत्रयुगामुळे निर्माण झालेल्या आपत्तीवर जसा लहान लहान उद्योग-धंद्यांचा इलाज आपण शोधून काढला त्याचप्रमाणे लोककल्याणकारी राज्या-मुळें आणि समाजवादी अर्थव्यवस्थेमुळे उत्पन्न होणाऱ्या सत्ताकेंद्रीकरणाच्या प्रश्नावरहि आपणास मार्ग शोधून काढला पाहिजे. याहिबाबत विकेंद्रित लोकसत्तेचे तत्त्व आपणास मार्गदर्शक ठरणार आहे. त्यासाठीं आजच्या राज्यसत्तेच्या कल्पनेमध्ये मूलभूतच फरक केला पाहिजे.

राज्याच्या उत्क्रांतीचा इतिहास पाहिला तर काहीं शतकांपूर्वींच राज्य-संस्था ही विविध समाजसंस्थांच्या कारभारावर केवळ देखरेख करणारे एक मंडळ होते असे आपणास दिसून येईल. देशामध्यें शातता, सुव्यवस्था राखून, शत्रूपासून समाजाचे संरक्षण करणें एवढेच तिचे प्रधान कार्य होतें. निरनिराळ्या समाजसस्थांना त्याच्या क्षेत्रात सपूर्ण स्वायत्तता होती. फक्त या विविध संस्थांचे परस्परामधील संबध सवादी आहेत कीं नाहीं एवढेच ते पहात होती. परतु पुढें औद्योगिक क्रांतीमुळे व तत्वविद्येमधील प्रगतीमुळे राज्याच्या स्वरूपांत बदल होत गेला. काहीं वर्षांपूर्वी जर राज्यसस्था समाज-जीवनाचें कमीतकमी नियत्रण करीत होती तर ती संस्था आजहि आपण कां निर्माण करूं शकणार नाहीं ? अशा प्रकारचें शासनयत्रच मानवाला पूर्वींचें सार्वभौमत्व अर्पण करूं शकेल.

प्राचीन किंवा मध्ययुगामध्यें राज्यसत्ता ही इतर संस्थांना स्वायत्तता देत

होती. तेंच स्वातन्त्र्य तिनें आजहि सर्व संस्थांना देणे जरूर आहे. परंतु त्या मध्ययुगीन कारभारात आणि आजच्या यत्नणेत महत्वाचे दोन फरक राहतील.

(१) पूर्वीचें शासनयत्र इतर समाजसस्थांना स्वायत्तता देत होते. त्यामध्ये सामर्थ्यापेक्षा अगतिकता जास्त होती. इतर संस्थावर प्रभावी नियंत्रण ठेवण्याचीं साधने त्या राज्यसत्तेजवळ नव्हतीं म्हणून नाइलाजानें ती इतर घटकाना स्वातन्त्र्य देत होती.

आजच्या शासनयत्राजवळ हें सामर्थ्य पूर्णाशाने आहे. प्रसग पडला तर त्याच्यावर ते पूर्णपणे नियंत्रण ठेवू शकेल. परतु जवळ साधने असून देखील आजची राजसत्ता इतर घटकांना स्वायत्तता अर्पण करणार आहे.

(२) पूर्वीच्या स्थानिक स्वायत्ततेमध्ये व्यक्तिवादाचा अगर लोकसत्तेचा प्रगत विचार प्रभावी नव्हता आजच्या विकेंद्रित समाजव्यवस्थेला उदात्त ध्येयवादाचें मोठे अधिष्ठान आहे.

एवढा फरक स्पष्ट केला म्हणजे या नव्या विकेंद्रित लोकसत्तेचे स्वरूप काय राहील याची चर्चा करावयाला हरकत नाहीं

या नव्या समाजव्यवस्थेमध्ये सर्व सत्ता देशातील अनेक स्थानिक संस्थांच्या हातात विखुरली जाईल या स्थानिक सस्था त्याच्या ताब्यातील भागावर राजकीय, आर्थिक, सामाजिक, सास्कृतिक नियत्रण ठेवील. त्याना हवे असणारे नियोजन त्याच ठरवितील. या स्थानिक सस्था लहान लहान ग्रामघटकावर उभारलेल्या असतील हे ग्रामघटक आपल्या गरजा त्याच्या स्थानिक सस्थाना सागतील व परस्पराच्या विचारमंथनातून त्याचें निर्णय बाहेर पडतील देशामध्ये अशा अनेक संस्थाचे जाळे पसरलेले असल्यामुळे त्याच्यांच विविध केंद्रामध्ये मध्यवर्ति सत्ता विभागली जाईल या विविध स्थानिक संस्थानीं उत्पादन, विभाजन इत्यादि सबधीचें निर्णय घ्यावयाचे परंतु या विविध घटकामध्यें सवादित्व रहावें म्हणून मध्यवर्ति सरकारनें त्यांच्यावर देखरेख ठेवावी. प्रसंगीं त्यांना मार्गदर्शन करावें. मध्यवर्ति सरकाराकडे अशा विकेंद्रित लोकसत्तेमध्ये महत्त्वाचीं दोनच कामें राहतील. एकतर परकीय आक्रमणापासून समाजाचें संरक्षण करणें आणि विविध गटामध्यें एकोपा किंवा सलोखा राखणें.

अर्थात् नव्या समाजव्यवस्थेचा हा पाया मान्य केला म्हणजे अनेक प्रश्न उपस्थित होतात. या स्थानिक सरकारवर मध्यवर्ति सत्तेचें नियंत्रण किती असणार ? त्यांच्या अंदाजपत्रकांचें स्वरूप काय राहणार, दोन स्थानिक संस्थांमधील संबंध कसे राहणार ? त्यांच्या नियंत्रणाखालीं किती भूमाग येणार ? या सर्व प्रश्नांचीं कांटेकोर उत्तरें आजच देणें कठीण आहे सहकारी अर्थव्यवस्थेची चर्चा करतांना स्थूल मानाने मार्गदर्शक तत्त्वे म्हणून जीं सांगितलीं तींच तत्त्वें याही स्थानिक संस्थांमध्ये मार्गदर्शक म्हणून गणलीं जातील. मूलभूत तत्त्वे दृष्टीसमोर असलीं म्हणजे तपशीलाचा प्रश्न गौणच मानला पाहिजे.

या नव्या विकेंद्रित लोकसत्तेसंबंधीं एक प्रश्न उपस्थित केला जाणे शक्य आहे. आज सर्वत्र, विशेषतः स्थानिक संस्थांमध्यें कोण भजभजपुरी माजली आहे. अशा स्थानिक सस्थांच्या हातात आणखी जास्त सत्ता सुपूर्त केली तर जास्तच अनर्थ माजणार नाहीं काय ? या शंकेमध्यें पुष्कळ तथ्य आहे. परंतु आपणास या नव्या समाजाच्या उभारीसाठीं एक तत्त्व सदैव मनांत बाळगलें पाहिजे आणि तें म्हणजे माणूस पिंडाने विवेकशील आहे त्याच्यामधील विवेकशीलता सुप्त असली तरी ती जागृत करणें शक्य आहे आणि त्याच्या या नैसर्गिक विवेकसंपन्नतेवर अभंग विश्वास टाकूनच आपणास सर्व प्रश्न सोडविले पाहिजेत. माणसाच्या विवेकशीलतेसंबंधीं जर आपण शंका घेतली तर व्यक्तिस्वातंत्र्य, लोकसत्ता हीं तत्त्वेंही आपणांस टाकून द्यावीं लागतील. त्यामुळें माणसांचें आजचें अज्ञान हें जरी पर्वताएवढे मोठें असलें तरी त्यांच्यातील सर्जनशीलता ही त्याहूनहि मोठी आहे असें आपणास गृहीत धरलें पाहिजे. हे गृहीतकृत्य आपल्या नव्या समाजरचनेचा मूलाधार आहे.

### मानवाचें अडीच हजार वर्षांचें व्यक्तिस्वातंत्र्याचें स्वप्न

व्यक्तींना जास्तींत जास्त स्वातंत्र्य मिळावें म्हणून मानवजात गेल्या अडीच हजार वर्षांपासून सतत झटत आहे. प्लेटोपासून रसेलपर्यंत अनेक तत्त्वचिंतकांनीं या प्रश्नाचा उहापोह केला आहे. तरी देखील मनुष्यमात्राची स्वातंत्र्याची इच्छा अतृप्तच राहिली आहे. सत्ताविकेंद्रीकरणामुळें स्वातंत्र्य अबाधित राखलें जातें एवढा ढोबळ नियम मात्र सर्वमान्य झाला आहे. सत्ता-

वेकेंद्रीकरणासाठीं मी तीन मार्गांचा अवलंब केला आहे. आर्थिक क्षेत्रांत सहकारी अर्थव्यवस्थेचा यशदायी म्हणून स्वीकार झाल्यास व्यक्तिस्वातंत्र्या-वरील संकटें टळतील असें वाटतें. सहकारी शेतीचे प्रयोग डेन्मार्क, स्वीडन या देशांमध्यें झालेले आहेत. तेथे ते बऱ्याच प्रमाणात यशस्वी झाले आहेत असें नामवंत अर्थशास्त्रज्ञांना देखील वाटतें. डेन्मार्क, स्वीडन हे देश लोक-संख्येनें लहान असल्यामुळें हा प्रयोग त्यांना सुकर झाला. हिंदुस्थानसारख्या खडतुल्य देशात तो कितपत फलदायी होईल याची शंका आहे. तरी देखील या सहकारी अर्थव्यवस्थेचा सहानुभूतीनें विचार व्हावयाला हरकत नाहीं. कल्पना मूर्त स्वरूपास येतांना काहीं अडचणी येतील. परंतु त्यांवर उपाय शोधून काढतां येतील. कुठलीही व्यवस्था प्रथमावस्थेंत परिपूर्ण असूं शकत नाही. अनुभवानें व नव्या ज्ञानाने तीं भर घालावयाची असते. हाच नियम याही अर्थव्यवस्थेला लागूं करावयाला काय हरकत आहे ?

सहकारी अर्थरचनेप्रमाणें जागृत समित्यांचा विचार आटोपशीरपणें येथे केलेला आहे. पक्षपद्धतीवर या ‘जागृत समित्या’ इतका प्रभावी उपाय अद्याप तरी दिसत नाहीं. समाज ही एक मोठी प्रयोगशाळाच आहे. या प्रयोगशाळेत या समित्यांना वाव मिळाला तर कदाचित् कल्पनेपेक्षां जास्त यश पदरांत पडेल. प्रथमच निराशावादी भूमिका घेण्याचें काय प्रयोजन ? हा प्रयोग फसला तर अनुभवापासून धडा घेऊन दुसरा मार्ग शोधून काढू. परंतु ‘समित्या’ चें साधन विश्वसनीय ठरलें तर आपणांस समाधानाचा निःश्वास टाकतां येईल. या पद्धतीचा पुरस्कार कॉ. मानवेंद्रनाथ रॉय यानीं अलीकडच्या काळांत विशेष जोमानें केला होता.

वरील दोन्ही मार्गांप्रमाणें शिक्षणाचें नवें तत्त्वज्ञान तयार होणें जरूर आहे. सहकारी जीवनाची कल्पना आतांपर्यंत अव्यक्तच होती. त्यामुळें अशा समाजव्यवस्थेला अनुकूल अशी शिक्षणपद्धति उदयाला आलीच नाहीं. आतां आपणांस शिक्षणाच्या नव्या जीवननिष्ठेची गरज भासूं लागली आहे. त्यामुळें आतांपर्यंत नसला तरी यापुढें या पद्धतीचा विचार अधिक काळजीपूर्वक होईल असा भरंवसा वाटतो. याच दिशेनें येथें हा एक नम्र प्रयत्न केलेला आहे.

या तिन्ही विचारपद्धतींच्या समन्वयांतून तयार होणारा समाज स्वातंत्र्याची आपली आस तृप्त करील अशी आशा बाळगली तर त्यांत काय अवास्तव होणार आहे ? उलट, आजच्या उपलब्ध ज्ञानावरून यांशिवाय दुसरे भरंवशाचे मार्ग अस्तित्वांत असतील असें वाटत नाहीं. ही पद्धति प्रत्यक्षांत उतरली तर पंचवीसशें वर्षांचे आपले परिश्रम सफळ झाले असें होईल.

## मानवी स्वातंत्र्य आणि मानवी संस्कृति यांचे अन्योन्य संबंध.

वरील व्यक्तिस्वातंत्र्याची आपली आकांक्षा साकार झाली तर मानवाच्या संस्कृतीला संपन्नता येईल. कारण मानवी स्वातंत्र्य आणि मानवी संस्कृति यांचे संबंध अत्यंत निकटचे आहे. स्वातंत्र्यामधून संस्कृति विकसित होत असते. आपल्या संस्कृतीचा इतिहास खऱ्या अर्थानें मानवी स्वातंत्र्याचा इतिहास आहे. या स्वातंत्र्यसंपन्न काळांत माणसाच्या क्रियाशील शक्ति बंधमुक्त होतात. त्यांच्या प्रगतीला भरपूर वाव मिळतो व संस्कृतीच्या ऐश्वर्यामध्ये आणखी एका नव्या लेण्याची भर पडते. या पुढच्या काळांत सर्व व्यक्तींना असे स्वातंत्र्य मिळाले तर आपली कला, विज्ञान, तत्त्वज्ञान हीं संस्कृतीचीं विविध अंगे कितीतरी संपन्न होतील. कोणी सांगावे, भविष्याच्या उदरांत कालिदास, भवभूतीसारखे थोर कलावंत दडलेले असतील, न्यूटन, गॅलिलियो यांच्यासारखे विज्ञानमहर्षि गुप्त राहिले असतील, बुद्ध, सॉक्रेटिस यांच्यासारखे तत्त्ववेत्ते संधीची मार्गप्रतीक्षा करीत असतील. मानवाला स्वातंत्र्याचा लाभ झाला तर कदाचित् या सर्व अज्ञात महापुरुषांचा आपणास शोध लागेल. या सर्व थोर पुरुषांना आपण स्वातंत्र्याचें देणें दिल्यास मानवी संस्कृतीला नवें तेज प्राप्त होईल. 'न भूतो न भविष्यति' असे ऐश्वर्य प्राप्त होईल. हें रम्य स्वप्न साकार करण्याचें कार्य सर्वस्वी मानवाच्याच हातांत आहे. कारण मानव हाच त्याच्या उज्ज्वल भविष्याचा शिल्पकार असतो हें त्रिकालाबाधित निर्विवाद सत्य आहे.

| ग्रंथ | ग्रंथकार | प्र. काल | प्रकाशक |
|---|---|---|---|
| राजनीतिशास्त्रप्रवेश | आचार्य शं. द. जावडेकर | १९२६ | शं. द. जावडेकर |
| राज्यशास्त्र | न. चिं. केळकर | १९३२ | वे. शा. बेलकुंदी नवभारत ग्रंथमाला, नागपूर. |
| मार्क्सवाद | स. रं. सुंठणकर | १९३६ | र. वा. जठार संपादक 'राजहंस' धारवाड. |
| रशियांतील राज्यक्रांति | पा. वा. गाडगीळ | १९३६ | य. गो. जोशी सदाशिव, पुणें २. |
| सोशॅलिझम् | पां. वा. गाडगीळ | १९३८ | य. गो. जोशी वादविवेचन माला, पुणें २ |
| अराज्यवाद | पा. वा. गाडगीळ | १९३९ | ,, |
| साम्राज्यशाही | ना. ग. गोरे | १९३९ | ,, |
| लोकशाही | आचार्य श. द. जावडेकर | १९४० | ,, |
| आधुनिक राज्यमीमांसा | आचार्य शं. द. जावडेकर | १९४० | ग. गं. जांभेकर लोकशिक्षण, लघुग्रथमाला, सदाशिव, पुणें. |
| गांधीवाद | आचार्य शं. द. जावडेकर | १९४० | य. गो. जोशी, वादविवेचन माला पुणें २. |
| मार्क्सच्या कॅपिटालचा सारग्रंथ | पां. वा. गाडगीळ | १९४१ | य. गो. जोशी पुणें २. |

| ग्रंथ | ग्रंथकार | प्र. काल | प्रकाशक |
|---|---|---|---|
| विश्वकुटुंबवाद | ना. ग. गोरे | १९४१ | य. यो. जोशी पुणें २. |
| हिंदी राष्ट्रवाद | स. रं. सुंठणकर | १९४१ | स. रं. सुंठणकर, कमला कॉटेज ठळकवाडी, बेळगांव. |
| फॅसिझम् | एम्. एन्. रॉय अनु. बा. कृ गलगली | — | — |
| राज्यशास्त्रप्रवेश | प्रो. हॅरॉल्ड जे. लास्की अनु. शं. कृ सबनीस | १९४५ | ज. मु. देशमुख |
| मानवजातीची कथा | डॉ. हेन्री थॉमस अनु. साने गुरुजी | १९४९ | सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, सदाशिव पुणे २ |
| राज्यशास्त्र | प्रा. व. म. सिरसीकर व स. मा. गर्गे | १९५२ | सौ. सुधा सिरसीकर, वेस्टर्न इंडिया सदन सदाशिव, पुणें २ |
| राज्यशास्त्राचा विकास | स मा. गर्गे | १९५४ | स. मा. गर्गे ४५९ सदाशिव, पुणें २ |
| भारतीय लोकसत्ता | डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे | १९५४ | जोशी लोखंडे, सदाशिव पुणें २ |
| नवमानवतावाद | एम्. एन्. रॉय अनु. प्रा. गोवर्धन पारीख | १९५५ | प्राज्ञ पाठशाळा वाई जि. उ. सातारा |

# सूचि

# शुद्धिपत्रक

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ३ | १ | आधिभौतिक | आध्यात्मिक |
| ३ | २१ | ,, | ,, |
| ५ | १९ | क्रोपोटन | क्रोपोटकीन |
| १५ | ४ | लाक्रेटिस | सॉक्रेटिस |
| १५ | १३ | म्हणजे | म्हणजे |
| १५ | १६ | समाजभूमिकेवरून | समान भूमिकेवरून |
| १९ | ६ | घेण | घेणें |
| २० | १९ | उमारली | उभारली |
| २१ | २२ | रज्य यंत्राचा | राज्य यंत्राचा |
| २२ | १२ | कल्यनांचा | कल्पनाचा |
| २५ | ९ | विश्वासनाय | विश्वसनीय |
| २५ | २० | सकल्प | संकल्प |
| २५ | २१ | सिाद्ध | सिद्धि |
| २६ | २५ | अशी | अशा |
| २९ | १९ | विश्वचिंनाकडून | विश्वचिंतनाकडून |
| २९ | २० | विचारवताला | विचारवंताला |
| ३० | २ | सदव | सदैव |
| ५७ | ८ | सदनशीर | सनदशीर |
| ६० | १० | बर्कगन | बर्कगन |
| ६६ | १० | नऊन | नेऊन |
| ६६ | १२ | अपर्ण | अर्पण |
| ६६ | १५ | सजनशील | सर्जनशील |
| ६६ | १५ | मॅ.गे | मार्ग |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ६७ | ११ | होकरात्मक | होकारात्मक |
| ६८ | ५ | कम्युनिष्ट | कम्युनिस्ट |
| ६९ | ७ | खासगी | खाजगी |
| ७३ | शेवटची | व्यापलल | व्यापलेले |
| ७६ | ३ | निर्मितींमागें | निर्मितीमागें |
| ७६ | ७ | सघानें | संघानें |
| ७६ | १० | Commis ion | Commission |
| ७६ | २१ | सव | सर्व |
| ७९ | ७ | करणें शक्य होईल | करणें कसें शक्य होईल |
| ७९ | ९ | सहकारा | सहकारी |
| ७९ | २३ | भाडवशाहीला | भांडवलशाहीला |
| ८० | ५ | नहे | नव्हे |
| ८० | १२ | म्हणन | म्हणून |
| ८१ | १ | संघषात | संघर्षांत |
| ८२ | ७ | कमगार | कामगार |
| ८५ | १४ | बनावण्याची | बनविण्याची |
| ८५ | १५ | लाकाना | लोकांना |
| ९२ | २४ | कम्युनिष्ट | कम्युनिस्ट |
| ९२ | २६ | "अखेरीस कम्युनिस्ट पक्षाचेहि विसजन" | (अखेरीस कम्युनिस्ट पक्षाचेहि विसर्जन) |
| ९८ | १० | खेळामध्य | खेळामध्यें |
| ९८ | १० | काशल्य | कौशल्य |
| १०५ | ११ | इतभार | हातभार |

---

पुणें विद्यापीठ बहि:शाल शिक्षण मंडळाची

# बहि:शाल शिक्षण ग्रंथमाला

## इतर प्रकाशनें

१. ‘जगाचें राजकारण’ .... .... मूल्य तीन रुपये

ले. प्रा. व. म. सिरसीकर

२. ‘वनश्री-दर्शन’ .... .... मूल्य अडीच रुपये

ले. डॉ. म. वि. आपटे

[illegible] भार[illegible] पशू’ .... .... मूल्य अडीच रुपये

ले. सौ. शकुन्तला पोंक्षे

[illegible] [illegible] श्रमिकांचीं लोकगीतें’...मूल्य अडीच रुपये

ले. सौ. अनसूया लिमये

## आगामी प्रकाशनें

६. ‘[illegible]’

ले. डॉ. म. वि. आपटे